श्री धन्वन्तरिः विजयते

# नव्यसूतशेखर

## आणि

# शतयोग प्रबन्ध





लेखक—वैद्य कविराज
मुकुंदराव अंबादासजी गायकवाड, सोलापूर.

सूतशेखर हे औषध, पित्तादिकां अनेक रोग मुख्य धरून इतरही अनेक व्याधीवर वापरण्याचा प्रघात महाराष्ट्रामध्यें आजतागायत वर्षानुवर्षे होता व आहे; ही वर्षानुवर्षे म्हणण्यापेक्षा शतकानुशतके किंबहुना बऱ्याच प्राचीन कालापासून चिकित्सक सर्वसाधारण सुशिक्षितही हें औषध परंपरेने उपयोगात आणीत आले आहेत. छोटी मोठी शहरे आणि खेडोपाडीं अशिक्षितातही हें औषध 'पित्ताची मात्रा' नांवानें ओळखलें जाते. ज्याप्रमाणें खापरी मात्रा म्हणजे रससिंदूर, महावात विध्वंसाची मात्रा, त्रिभुवन कीर्ती, हेमगर्भ ही औषधे जनसामान्यांत प्रचलित आहेत; तद्वतच मी माझ्या लहानपणापासून या सूतशेखराचीही ख्याती-एक द्रिव्यौषध म्हणूनच ओळखत आलों आहे.

दैनंदिन चिकित्सा व्यवसायांत याचा वापर करीत असतां, हे औषध अधिक प्रभावी असावे आणि ते सहज सुलभतेनें नेहमी मिळत राहावें असे बनविण्याचा विचार आला; म्हणून यांतील ताम्रभस्म सौम्य स्वभावाचे पण गुणधर्मानें मात्र अधिक आणि पित्त विकारांत जास्त कार्यक्षम व्हावें म्हणून अनेक प्रयोग करून शेवटीं 'ताप्यहतताम्र' हा ताम्र भस्माचा पाठ बसवून यात उपयोगांत आणला. तसेंच या सूतशेखराचा जनक कोण याचा मागोवा घेत असतां पुढील माहिती उपलब्ध झाली. तिचा थोडक्यांत सारांश असा-महाराष्ट्रांत अधिक उपयोगांत असलेला योगरत्नाकर हा संग्रहग्रंथ, त्यांतील सूतशेखराच्या पाठारंभी 'सारसंग्रहातून' उतारा घेतल्याचा उल्लेख आढळला. सारसंग्रहाची एक ताडपत्रावर कोरून लिहिलेली प्रत नरसिंह देवतेचे मंगलाचरण असलेली व

पूज्यपादाचार्यांचे नांव असलेली आढळली. हे पूज्यपाद महाप्रयत्नवादी व दीर्घोद्योगी प्रसिद्ध नागार्जुन रससिद्धाचें मामा होत. लहानपणी अशक्त व रोगट प्रकृतीचा हा नागार्जुन त्याच्या आईबापाच्या उतारवयात झालेला आणि या मामाकडून त्याचा प्रतिपाळ व अपमृत्युपासून बचाव केला गेलेला; असा पुढे सुदीर्घायुषी आणि आयुरारोग्य संपन्न बनल्याचा उल्लेख अनेक ग्रंथातून आहे. आयुर्वेदातील रसायन शास्त्राचा विशेष अभ्यास करण्याकरितां नागार्जुन मांडव्य ऋषीकडे गेल्याची माहिती उपलब्ध आहे. मांडव्यऋषीचे वास्तव्य अहमदनगर जिल्ह्यांतील श्रीगोंदे तालुक्यांत कात्रावाद–मांडवगड या भागांत होते. आजही त्या ठिकाणी त्यांची तपोभूमी आणि मंदिर आहे. प्राचीन काळीं या भागांत घनदाट अरण्य होते. हिंस्त्र श्वापदे आणि कबंधासारखे नरभक्षक आदि मानव, सदृश पशूंची वस्ती या निबिड अरण्यांत असल्यामुळे नागार्जुन आकाश मार्गानें तिथे गेल्याचा उल्लेख आहे. महाराष्ट्रात जन्मलेला व नीरा नरसिंगपूराच्या महाराष्ट्रीय परिसरातच बालपण गेलेला आणि मांडव्य ऋषीकडून रसशास्त्रीय खनिजांचा विशेष अभ्यास केलेला हा नागार्जुन नालंदा या उत्तरेकडील विश्वविद्यालयाचा कुलगुरु–प्राचार्य होता. महाराष्ट्रातच आयुष्य न घालवितां नागार्जुनानें तत्कालीन बहुतेक सर्व जगात भटकंती केल्याचें नमूद आहे. या प्रवासांत त्यानें श्वेतद्वीप (स्पेन किंवा सिसिली), भोट, दरददेश, काश्मीर, ब्रह्मदेश, चीन, रत्नद्वीप (सिलोन–लंका), कपोतगिरी (कप्पट गुड्ड) आदि भागातील खाणी उघडल्याचा पुरावा उपलब्ध झाला आहे. पूज्यपादीय सारसंग्रहांतील सूतशेखराच्या पाठांतील, " शुद्ध सूतं मृतं लोहं . . . । " या उल्लेखाने सूतशेखराचा एक प्रयोग लोहभस्म घालून उपयोगांत आणून पाहिला. असे प्रयोग करणे चालू असतां नागार्जुनाच्या लोहशास्त्र नामक प्रचण्ड ग्रंथांत

लोखंडाच्या ३४ जातींचा उल्लेख आढळला. याच ग्रंथांत भारद्वाजांनी अभ्रकाच्या दोन हजार जाती शोधून काढल्याचाही उल्लेख आहे. भारताच्या अगणित ग्रंथसंपत्तीचा नाश, प्राचीन परंपरा असलेल्या अनेक विद्वान घराण्यांची झालेली खच्ची, यामुळे अतोनात नुकसान झाले आहे. नागार्जुनाचा परममित्र हाल सातवाहन सम्राट ऊर्फ शककर्ता शालिवाहन हा प्रतिष्ठान म्हणजे हल्लीचे मराठवाड्यातील पैठण येथे राज्य करीत होता. त्याने आपले सूर्यवंशी घराण्याचे कुलदैवत मार्तंडभैरव याचे "मार्तंडमंदिर" गोव्यांत उभारले होते असें कळतें. त्याच्या दर्शनी दरवाजाचे खांब पोलादी होते. गोव्यांतील मँगॅनीज धातूची खाण त्या काळी कदाचित् नागार्जुनानेच या शालीवाहनाच्या साहाय्याने चालू केली नसेल कशावरून ? तेव्हां लोहाचे सूतशेखरामधील पाठातील उल्लेखावरून लोहशब्दानें मँगॅनीज धातूचें भस्म करून सूतशेखरात घालून पाहाण्याचा एक उपक्रम केला. तो उत्तम साधला. मँगॅनीजच कां घातले यालाही तसेंच कारण आहे. त्याचे थोडक्यात विवेचन असें की रेवणसिद्धाचे "सिद्धसारामृत" ग्रंथांत नवनाथपंथी रसशास्त्रीय औषधी माहितीबरोबरच सहस्त्रवेधी या खनिज द्रव्याचा उल्लेख आलेला आहे. या सहस्त्रवेधी खनिजाबद्दलचे संशोधन करीत असतां; तो शब्द मँगॅनीज धातूचे खनिजाबद्दल वापरल्याची खात्री झाली. आतां या सहस्त्रवेधी खनिजातून जेव्हां भारतीय धातुकोविदानी मँगॅनीज वेगळा केला असेल, तेव्हां त्याला कांही तरी नामाभिधान केलेच असावे. त्याचा शोध करितां रसरत्नसमुच्चयांतील, "विक्रुन्तयति लोहानि तेन वैक्रान्तक स्मृतः।" ह्या महत्वाच्या उल्लेखाकडे लक्ष्य वेधले; कारण वैक्रान्तक शब्द चाणक्याने "कौटिलीय अर्थ शास्त्र" ग्रंथांत वैकृतन्तक धातु या शब्दाने उल्लेखिला आहे. प्राचीन भारतीय धातुविदानी लोखंडाला

काठिण्य आणण्याकरियां या वैकृंतक धातूचा उपयोग केलेला होता. तोच संयोग हल्ली पोलाद नांवानें किंवा इंग्रजीत स्टील शब्दाने प्रचलित आहे. नागार्जुनाने जेव्हां उत्तरेकडे पाटलीपुत्र भागाकडे वास्तव्य केले, त्या कालांत बिहारचे मँगॅनीज धातूच्या व लोखंडाच्या भूगर्भातील खनिजांच्या परिसराचा भूप्रदेश त्याच्या दृष्टीपथांतून नक्कीच सुटला नसेल; कारण त्या कालातच आगेमागे केव्हातरी गुप्तवंशी चंद्र राजाने एक जयस्तम्भ कठीण व न गंजणाऱ्या लोखंडाचा उभारला होता. तोच दिल्लीत आणवून मोगली सुलतानानी रोवून ठेवलेला आहे. त्याला आज अशोक स्तंभ नांवाने ओळखले जाते. हा न गंजणाऱ्या लोहधातूचा असून हा स्तम्भ वैकृंतक लोहाच्या संयोगाने केल्याचे आढळते. मँगॅनीजांत लोखंडाचे औषधी गुणधर्म तर आहेतच; पण या शिवाय त्याचे विशेष गुणधर्मही असे आढळले की; सूतशेखरासारख्या पित्त शामक औषधाला उपयुक्त ठरावे. वैक्रान्त हा शब्द वैद्यकांत रत्नवर्गात वापरला जातो, म्हणून घोटाळा होऊ नये म्हणून मँगॅनीजाला लोहवैक्रान्त आणि तुरमल्ली रत्नखड्याला रत्नवैक्रान्त हे शब्द योजले आहेत. लोखंड सदृश म्हणून मँगॅनीज लोहाला डॉ. देसाईनी ' अयस्कांति ' हा शब्द वापरला आहे. सूतशेखराचे गुणधर्मवृद्धीला पोषक असा आणखी एक खनिज पदार्थ आढळला. तो म्हणजे ' जहर मोहरा खताई ' हा होय. त्याच्याबद्दल माहिती भारतीय रसशास्त्र या पुस्तकावरुन ग्रथित केली आहे. डॉक्टर देसाई लिहितात की– " ह्यांत फार मौल्यवान व उपयुक्त धातू असतात. उदा. सोने, पांढरे सोने (प्लॅटिनम्), तांबे, निकेल, क्रोम आयर्न-हा यकृताचे रोगांत देतात. " यास ' चित्राश्म ' नांव दिले आहे. या दगडाचे सूक्ष्मचूर्ण म्हणजेच चित्राश्म पिष्ठी होय. उद्भिज्ज द्रव्यापैकीं कोंबडनखी व उंटकटारी या दोन वनस्पतीही अशाच योग्य व सूतशेखराला पोषख आढळल्या. जीवन जगण्याची दुर्दम्य शक्ति या दोहोंत विशेष-

करून दिसून आली. रात्रीं उंटकटारीचे झुडुपास युवतीने पिळा घालून त्यावर त्याला न पेलणारा एक दगड ठेऊन यावें. रात्र सरतांच सकाळी हा दगड बाजूस झुगारून हें झुडूप दिमाखाने उभे असल्याचे आढळते ! शिवाय हे माक्याच्याच वर्गात मोडणारें आहे. असो ! या विशेष द्रव्यांचे संयोगामुळें या सूतशेखराला 'नव्य सूतशेखर' असें नांव देणे ओघानेच आले. नव्य सूतशेखराचे अनुषंगानें उपयोजिलेले इतर शंभराचेही वर असे इतर पाठ या प्रबंधाचे उत्तरार्धांत जे लिहिले आहेत, त्यांच्यापैकीं कांही प्रचलित आहेत. त्यांचे गुणधर्म वाढीकरितां केलेले बदल अनुभव घेऊनच घडवले आहेत. असो ! शेवटी ज्ञानदेवानी म्हटल्याप्रमाणें–

वत्स धालयाही वरी।
धेनू न वचावी दूरी ।
अनन्य प्रीतीची परी ।
ऐसी आहे ॥

" वासराचें पोट भरल्यावरही गाईने त्याचेपासून दूर न व्हावे " हे जसें आत्यंतिक प्रेमाचे लक्षण आहे, तसे या प्रबंधाची जडण घडण करीत असतां माझ्या अनेक मित्रानी आणि वडीलधाऱ्यानी मला अत्यंत प्रेमानें साहाय्य केले आहे. त्यांच्या उपकाराचे ऋण फार मोठें आहे. त्यानी माझ्यावर अशीच प्रेमाची पाखर धरावी अशी विनंती.

तसेंच सदर पुस्तक छपाईच्या कामीं लोकसेवा सहकारी मुद्रणालय सोलापूर यांतील कर्मचारी वर्गानें अत्यंत प्रेमाने व आपुलकीने माझ्या अपेक्षेप्रमाणें छपाई करून दिली याबद्दल त्यांचा मी आभारी आहे.

वैद्य–मुकुंद अंबादास गायकवाड

ता. २०–८–१९७६

## – अभिप्राय –

वैद्य कविराज श्री. मुकुंदराव गायकवाड यांचेकडून 'नव्य सूतशेखर' हे औषध मला नेहमी येणाऱ्या घेरीं व झोले जाणे या विकारावर घेऊन पाहता, अत्यंत उत्तम गुण आला. त्यांचे "नव्य सूतशेखर आणि शतयोग प्रबंध" हे पुस्तक सर्व सामान्य जनतेला उत्तम मार्गदर्शन करणारे वाटले.

**म. वि. सापटणेकर**
रेल्वे खाते, १४ ऑगस्ट १९७६.

# पुरस्कार

मानवी जीवनाची खरीं संपत्ति, त्याचे खरे भाग्य म्हणजे शरीर निरोगी असणें. निरोगी शरीरामुळे त्याला जीवनांतील सर्व सुखे व जीवनांतील खरा आनंद उपभोगता येतो.

'पहला सुख निरोगी काया'

ही म्हण सर्वांचे परिचयाची आहेच. निरोगीपणामुळेच मनुष्याला त्याचा रोजचा आहार चवीने घेणें, निद्रासुख अनुभवणें आणि रोजचे नेमून घेतलेले काम उत्साहानें करणें या गोष्टीत रस वाटेल.

भारतांतील किंवहुना या जगांतील अतिप्राचीन वाङमय साहित्य म्हणजे वेद वाङमय. या वैदिक वाङमयातील आयुर्वेद हे एक महत्वाचे अंग म्हणून सांगितले आहे. त्यात सविस्तरपणें खनिज, प्राणिज, उद्‌भिज्ज ( वनस्पती ) आदि पदार्थापासून मानवाचे जीवन निरोगी राहावे म्हणून ज्ञात्यांनी नानाप्रकारची माहिती ग्रथित करुन ठेवली आहे. त्यांतूनच वैद्य मुकुन्दराव गायकवाड यांनी त्यांचे गेल्या चाळीस वर्षांच्या वैद्यक व्यवसाया-तील अनुभवाचे सार म्हणून हा 'नव्य सूतशेखर आणि शतयोग' नांवाचा लहानसा प्रबंध लिहून जनताजनार्दनापुढे सादर केला आहे. पुस्तक लहानसेच पण यांत सांगितलेली माहिती इतकी मह-त्वाची आहे की, आयुर्वेदाची सर्वसाधारण माहिती असलेला माणूस-देखील या पुस्तकाच्या आधारानें अनेक रोगावर मात करण्याची हिम्मत करील; मग सुशिक्षित व शासनमान्य पदवीधर वैद्य अगदी निष्णात होईल, यात मला तिळमात्र शंका वाटत नाही. पण चिकित्सा करणारा वैद्य जेव्हा यात सांगितलेल्या औषधाप्रमाणें औषधे स्वतःची स्वतः घरी तयार करून वापरील, तर फार बहारीचे होणार आहे; आणि याच उद्देशानें वैद्य मुकुन्दराव गायकवाड यांनी ह्या छोटेखानी प्रबंधाची रचना केली आहे.

नव्य सूतशेखर आणि शतयोग प्रबंध हे पुस्तक प्रकाशित होत आहे; याबद्दल मला अत्यंत आनंद होत आहे. पण खऱ्या

अर्थाने म्हणावयाचे तर वैद्यकीय व्यवसायातील दर्दी चिकित्सकाना हे पुस्तक पाहून कल्पनातीत आनंद वाटेल.

वैद्य मुकुन्दराव यांचा आयुर्वेदाबाबतचा व्यासंग आणि अभ्यास हा त्यांना त्यांच्या लहानपणापासूनचा आवडता छंद असून, कोणतीही औषध योजना ते स्वतः करुन, अनुभव घेऊन मगच ती योजना जगाच्या बाजारात आणतात. "आपली योजना दुसऱ्यास माहिती पडू नये, ती फक्त आपणासच माहित असावी, तिचा उपयोग मीच केला पाहिजे." अशी जी मनोवृत्ति आपल्या भारतांतील अनेकांमध्ये आहे, त्यायोगे चांगली प्रभावी औषधेही सर्व त्या माणसाबरोबरच लयाला गेलीत व आजही जाताहेत, ही अत्यंत दुर्दैवाची गोष्ट आहे. ही कधीही भरून न येणारी गोष्ट होय. पण वैद्य मुकुन्दराव गायकवाड यांची ही वरील प्रवृत्ति नसून "जें जे आपणासी ठावे । तें तें दुसऱ्यासी शिकवावे । शहाणे करुन सोडावे । सकळ जन ।।" या श्री समर्थ रामदासांच्या उक्तीप्रमाणें त्यांना या वैद्यकीय शास्त्रातील जे जे अनुभव प्रत्यक्ष स्वकृतीने आलेत, ते सर्व वृत्तपत्रे, साप्ताहिके, औषधी मासिके यांतून प्रसृत करतात. प्रसंगी वैद्यजनांच्या बैठकीत दिलखुलासपणे कसलाही आड पडदा न ठेवता समग्र सांगतात. त्यांच्या या औषधांचा उपयोग अनेक वैद्य तसेंच प्रसंगी कांही डॉक्टरांनीही प्रचारांत आणून सर्वांनी समाधान व्यक्त केले आहे. त्यांचे हे पुस्तक जनतेच्या खास उपयोगी पडेल, व त्यांचा वैद्यक वर्ग चांगला उपयोग करून घेतील असा मला विश्वास आहे. वैद्य मुकुन्दराव गायकवाड यांचे हातून जनकल्याणाचे महत्कार्य असेच अखंड चालावे व ते चालण्यासाठी त्यांना व त्यांच्या उभय चिरंजीवांना — जे याच वैद्यकीय क्षेत्रात आहेत त्यांना दीर्घायुरारोग्याची सदिच्छा व्यक्त करून माझा हा 'नव्य सूतशेखर आणि शतयोग प्रबंध' या पुस्तकावरील पुरस्कार येथेंच थांबवितो.

जय हिन्द ! जय महाराष्ट्र ! !

आ. नम्र-**आण्णा तथा सी. शं. साळुंखे**
विशेष कार्यकारी दंडाधिकारी सोलापूर.
सदस्य सल्लागार समिती सार्वजनिक रुग्णालय, सोलापूर.

# - विषयानुसूची -

## अ वर्ग



## क वर्ग

## च वर्ग



## ट वर्ग



## त वर्ग



## प वर्ग

य, र, ल, व.

## – योगादि द्रव्यांची सूची –

### अ वर्ग

## क वर्ग



## च ट वर्ग



## त वर्ग

प वर्ग



य, र, ल, व.

### श, ष, स

ह वर्ग



---

**योग्य खबरदारी –**

या पुस्तिकेत कांहीं ठिकाणीं गांजा, भांग व अफू यांचा उपयोग करावा असा संदर्भ आलेला आहे; तरी औषध योजकाने गांजा, भांग व अफू यांचा सरकारी परवाना घेऊनच योग्य ती औषधी योजना करण्याची खबरदारी अवश्य घ्यावी ही विनंती.



# शुद्धिपत्र

| अशुद्ध | पान नंबर | ओळ नं. | शुद्ध |
|---|---|---|---|
| साधारणता | ३ | ३ | साधारणतः |
| अन्तः त्रास्वी | ४ | ४ | अन्तस्त्रावी |
| मज्जात धातुगत | १० | २ | मज्जाधातुगत |
| क्षोम | १३ | २५ | क्षोभ |
| विश्वाणिगुडा | १४ | ७ | विश्वाग्नि गुडा |
| दाखवयाचा | १८ | ४ | दाखवावयाचा |
| योजवा | १८ | २० | योजावा |
| सूतशखर | १८ | २० | सूतशेखर |
| घातकी | २३ | १ | धातकी |
| धनासह | २३ | ११ | घनासह |
| गावर्त | २६ | १७ | आवर्त |
| दिवसातूत | २७ | २३ | दिवसातून |
| वायूचा | २८ | ६ | स्नायूचा |
| स्नायु त्यांतून | ३० | २४ | स्नायुकंडरानाही |
| ध्रंडज | ३२ | १८ | $\frac{1}{4}$ गुंज |
| दृढमूस | ३२ | २३ | दृढमूल |
| पुढी | ३३ | २० | पुडी |
| तञ्ज्ञांचे | ३३ | २४ | तज्ज्ञांचे |
| Myocardition | ३९ | २० | Myocarditis |
| उदाहरणार्ण | ४३ | १५ | उदाहरणार्थ |
| नास्तास्थिवृद्धि | ४४ | २२ | नासास्थिवृद्धि |
| शाक्तिक | ४५ | ९ | शौक्तिक |
| आठड्यानी | ४५ | १४ | आठवड्यानी |
| यच्य | ५१ | २५ | यच्च |
| मच्यते | ५१ | २५ | मुच्यते |
| गंधांत | ६३ | २० | ग्रंथांत |
| शुद्धीहिंगूळ | ७२ | ३ | शुद्ध हिंगूळ |
| वेदनाना | ७६ | ३ | वेदना नाना |

| अशुद्ध | पान नंबर | ओळ नं. | शुद्ध |
|---|---|---|---|
| तुरभली | ७६ | ९. | तुरमली |
| कडबी | ७६ | २२ | कडवी |
| हे तूप | ८० | ३ | हे मिश्रण तूप |
| स्नानाच्या | ९९ | ११ | स्थानाच्या |
| पानकुटीरस | १०० | २३ | पानफुटीरस |
| (शटपुंखा) | १०१ | ९ | (शरपुंखा) |
| वसून | १०१ | १४ | असून |
| जेथे | १०१ | १४ | तेथे |
| न | १०३ | १८ | व |
| पांडुयोगघ्न | १०३ | २३ | पांडुरोगघ्न |
| तुत्थसव्यीरयोग | १०४ | ८ | तुत्थ सव्वीरयोग |

कंडरा नाही पान ३० – शेवटीं आहे तो वाचतांना!– (सर्व स्नायु कंडरानाहीं त्यांतून असा पुढें वाचावा.



# Forward.

## Ayurved Research Centre,
### SOLAPUR.

We take great pleasure in presenting the chemical properties and neo-concepts in the preparation of **Sutshekhar.** We must thank Dr. Mukundrao Gaikwad most heartly for the great amount of creative effort he had taken in preparation of this **Neo-Sutshekhar.** He has worked for the last 40 years singularly in trials and study of this drug in several diseases and patients in his practice of medicine. The material in this book reflects his untiering efforts for finding the basic facts and ideas, new forms of regulations and processes in the analytico-synthetic preparation of **Sutshekhar** compound, presrving the unity and integrity of active principles from plants and chemicals. Analytico - synthetic & Biochemical reserachtecheniques in this drug will prove definetly and extremely fruitful to the society of medical world.

It is not the so-called marketed **Sutshekhar, Neo-Sutshekhar** is an effort done according to scientific procedures described in Ayurvedic texts.

The auther Dr. Mukundrao Gaikwad is well-known and has contributed various articles on medicinal plants and treatment in various Ayurvedic Journals since a very long time. He has been regularly conducting a column in local newspaper

and periodical where in he describes easy treatment on various common diseases by collecting freely available plants and material from local bazar.

**What is Sutshekhar ?**

This drug is a chemical combination with active principles of plants and their alkeloids with mercury, sulphur, copper, manganese, calcium, & serpentine in purified forms processed by Ayurvedic methods.

**How it acts :-**

It acts due to its pharmaco – dynamic action of active ingredients present in it. This drug combination contains molecules of oxygen from plants and chemicals, with their active principles. They help metabolism with oxygenation of tissue cells.

**Its uses :-**

This matra is used in Hyperacidity, loss of appetite, Indigestion, Hiccup due to reflex from stomach, liver, diaphragm & Neurosis; Gastric – flatulance due to fermentation of gastric contents. Hyperacidity, vomitting, colitis, upper respiratary tract infections causing dry cough and Bronchitis are relieved when given this matra with vasaka syrup. This matra is used in both diseases caused by abnormal functional conditions of **Vata & Pitta.**

On **Vata abnormality** it is analgesic and in **Pitta abnormality** it improves the imbalance of **Pachaka Pitta** i. e. enzymes in the oxyentic cells of stomach.

In Gastric syndrome due to vitiation of **Vata** there is pain and due to **Pitta** Heartburn-Acidic Erructations, unpleasent sensation and disturbance in appatite, vomitting of yellow coloured contents etc. This matra gives good remarkable results without side effects and prevents Gastric and duodenal ulcers.

Ayurvedic text compairs blood and bile ( **Rakta and Pitta** ) having similar properties, that is why **Sutshekhar** is usful in abnormal blood and abnormal bile conditions.

As its action on blood neutralises the toxic end products of metabolism it is effective in Pittaja-Heart disease (Pittaja Hrudrog). In this condition its action is caused by reducing the increased cholesterol ( Paitava ) in blood. In Pittaja Heart disease the perspiration and fatigue, burning in chest, Angina, dizziness before eyes, syncope, fear fever and stupor, pale and yellow skin occur which is relieved by **Sutshekhar.**

It also ihibits abnormal increase of Blood-choleseterol, Blood urea, Blood sugar and as such in bradicardia. It acts on central nervous system, Vagus nerve, blood vessels, cardio-vascular system

in syncopy and bradicardia due to hypersensative carotid body. As it acts locally and through the Central Nervous system, its effect is seen in both Hypertention and Hypotention and thus the Blood-pressure remains stabilised.

The modern anti-hypertensive drugs can be used safely without any side effects if given along with **Sutshekhar**. It is the best medicine in Typhoid state, in plummer-vinson syndrome and irritable colon syndrome.

In-parkinsonism for relief of tremer and rigidity and excessive salivation. Tension-Head-ache unbearable to patient is relieved by it. In **Pittaja-head-ache** burning sensation in head, vomitting of food, **Sutshekhar** acts as a boon by its properties. Sutshekhar is Raktastambhak when used in Epistaxis **Rakta-Prasadak** ( Blood purifier ) and **Balavardhaka** due to its inherent properties.

It has also got **Isotopic** properties of unknown origin which is seen in improving the dysphagia, vomitting, burning and feeling of smoke in the tissues, hot flushes, caused by Radiation therapy in Cancer cases.

It activates metabolic pattern by toning up neuro-glandular functions.

**Sutshekar** is useful in all allergic conditions, urticarias, serum sickness ( after ATS or ADS ), in serous inflamations and in Jaundice. Sutshekhar

contains **Shankha Bhasma** and **Serpentine.** In Yoga-Ratnakara an ancient Ayurvedic text Shankha Bhasma is discribed to be useful in Spleenomagaly even as hard as armour-plate. Serpentine contains many valuable ingredients such as platinum, gold, copprr, Nickle etc.

**What is Matra ? :-**

Matra is an Ayurvedic medicinal compound which is so stable that it can be used from generation to generation. Medicine containing Mercury are known as **Matra or Rasa Kalpas.**

Purified Mercury is useful in all diseases even it will act on cancer, as it penetrates all the tissue cells immediately, acts as a catalyser and eliminated from the body tissues.

As Saint Dnyaneshwar has apty discribed its action 700 years ago.

" जैसे रसौषध खरे । आपुले काज करुनी पुरे, ।
शेखी आपणही नुरे । तैसे होतसे ।। "

**Kajjali** ( Mercury and Sulphur combination ) in all Ayurvedic Rasa kalpas is supposed to act and potetiate active principles of plants and keeps the compound without degeneration and decay for several years. Also the dose of the medicine is reduced to minimum in this method of treatment. The Matras are usually administered as linctus. The drug enters through mucous-membrane and

spreads immediatly in the tissues, stimulating the nerves, acts through the Central Nervous System. It not only act immediatly but also keeps long acting blood-level and tissue-level there by avoiding complication and toxic effects of exotoxins of all the micro-organisms. These drugs were used in all emmergencies even in the last gasping stage and had shown wounders. Thus it acts on all **Sannipatas** i. e. critical conditions.

If you do not diagnose a disease very soon use Sutshekhar till you diagnose it.

It is actually a **Broad-Sepctrum** drug of choice in Ayurvedic medicine.

From time immemorial we in India were aware of the effects of Matras, because it worked wounders in emmergencies.

**Why this tradition disappeared !**

The cause was the foreign invasions such as Moghals and British rule. In that age of darkness Ayurved was purposely supressed and neglected. Ayurved is the only medical therapy suitable for this soil, air and religion.

Even to-day if you prepare and use the drug scientifically according to Ayuredic text it gives the same results which worked miracles for ages.

Like any other medical practice Ayurved requires constant study of surrounding plants, experiments and trials. Ayurved cannot remain behind in advancement of its science when several laborataries of the world are busy to explore the truth of medicine for the benifit of humanity.

**Scope of Ayurved :-**

Now after experienceing the disasterous side effects of modern Antibiotics which are also causing a threat of Iactrogenic diseases the foreign researchers and physicians are looking towards this ancient science Ayurved for the solace of human sufferings.

It is wellknown that research and study of Ayurved is conducted in many foreign countries such as Germany, Russia etc.

This book will be useful to all the medical practitioners as well as others who have curiousity in this seience.

Ayurved Researchers

**Dr. N. S. Ranade** B. Sc., B. A. M. S.

**Dr. A. S. Patil.** B. A. M. S.

## वक्तव्य-

एखादे महत्वाचें औषधी द्रव्य कालमानपरिस्थितीमुळें दुर्मिळता, महर्घता, शासकीय कायदेकानूची आडकाठी, उपलब्धीची अशाश्वती, अज्ञेयता किंवा अनानुकूल्य आदि कारणानी वेळेवर हाताशी नसल्यास अडून न बसतां तत्सदृश गुणधर्माचें एक अगर त्याचे गुणधर्माचा समुच्चय साधण्याकरितां अनेक अनुकूल द्रव्यांचें सम्मेलन करून कां होईना गुण साधर्म्य आणन त्या द्रव्यांचा प्रतिनिधि उभा करिता येतो, आणि चिकित्सा यशांचा कार्यभाग साधून घेतां येतो.

योग रत्नाकरांतील अभाववर्ग हें प्रकरण याचकरितां लिहिलें गेलें आहे.

या प्रबंधांत आलेल्या सहयोगी द्रव्यघटकांत अफू, भांग, गांजा या द्रव्यांचे प्रतिनिधी हवे असल्यास ते पुढीलप्रमाणें योजावेत.

**अफूचा प्रतिनिधी-१)** खसखशीची बोंडे एक भाग + पाणी सोळा भाग एकत्र शिजवून चौथाई पाणी उरल्यावर गाळून पुन्हा आटवून मधासारखें घट्ट होत आलें म्हणजे त्यांत खसखशीचे दूध मिळवून तें जिरेपर्यंत अग्नि चालूच ठेवावा. द्रवभाग जवळजवळ संपत आला असतां; त्यांत गुडूची घन मिळवून घोटून एकजीव करावा, आणि त्या मिश्रणाच्या वड्या, कांड्या वगैरे वळून चांगल्या खडखडीत सुकवून ठेवाव्यात. हें द्रव्य अफूचा प्रतिनिधी आहे. हें २½ गुंजा मिश्रण, एक गुंज अफूऐवजी घ्यावें.

२) काहू किंवा सालीटची भाजी नामक झुडुपामधील पांढरा चीक सुकवून जो पदार्थ मिळतो तो अफूचा प्रतिनिधी आहे.

**खसखशीचे दूध**-खसखस भिजवून फुगल्यावर वाटावी आणि पिळून दुधासारखें निघालेलें पाणी घ्यावें; तेंच दूध.

**भांग, गांजा यांचा प्रतिनिधी**-हरमल, उपलेट, जायफळ आणि खुरासानी ओवा एकत्रून घोटून ठेवावेंत. हें मिश्रण भांग किंवा गांजा यांच्या १ गुंजेऐवजी २½ गुंजा घ्यावें. ही सर्व औषधे बाजारात काष्ठौषधी विक्रेत्याकडे मिळतात.

अफू, भांग, गांजा यांचेऐवजी प्रसंगी मी यांचा उपयोग केलेला आहे.

-लेखक

# अ भि प्रा य



## आशीर्वाद–

सततोद्योगी, विद्या व्यासंगी आणि अभिनव आयुर्वेदीय औषधी पाठ संयोजक वैद्यश्री मुकुंदराव अंबादास गायकवाड, सोलापूर ह्यांनी योगरत्नाकरोक्त अम्लपित्त चिकित्सेंतील सूतशेखर नामक औषधी पाठ सुधारण्याकरितां निवडला व मूळ पाठांतील सोने वगळून व लोह, जहर मोहरा, कोंबडनखी आणि उट्कटारी ह्यांची नव्याने जोड देऊन नवीन पाठ बसविला. ह्या बद्दल ते धन्यवादास पात्र आहेत.

नवीन पाठा बाबत त्यांना आलेले अनुभव "नव्य सुतशेखर आणि शतयोग प्रबंध" ह्या पुस्तकांत त्यांनी दिले आहेत.

हें पुस्तक प्रकाशित करून एक फार मोठी आणि बहुमोल आयुर्वेद सेवा लेखकांनी बजाविली आहे, ह्याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतो आणि अशीच कामगिरी त्यांचें हांतून सतत घडत राहो; हा शुभाशीर्वाद त्यांना देतो.

**वैद्य पु. वि. धामणकर**
गृहीतायुर्वेद
परदेशी ओळ, मु. पनवेल, जि. कुलाबा.

वैद्यराज मुकुंदराव गायकवाड यांचा व माझा परिचय बऱ्याच वर्षांचा आहे. ते सतत वैद्यकीय व्यासंगात असतात. वनस्पति हा चिकित्सेचा मूळ पाया आहे. हे जाणून त्यांनी त्या शास्त्राचा सतत अभ्यास केला. आणि वनस्पतीचे अद्यावत ज्ञान संपादन केले. अनेक पदवीधर वैद्यांना वनस्पतीचे ज्ञान त्रोटक असते. त्यामुळे सर्वसामान्य वैद्य नवीन कल्प बनवू शकत नाहीत. नवीन कल्प बनविण्यासाठी वनस्पतींच्या संपूर्ण ज्ञानाची आवश्यकता असते. व हें ज्ञान वैद्यराज गायकवाड यांना असल्यामुळे त्यांनी "नव्य सूतशेखर" हा नवीन कल्प तयार केला. त्यांनी अनेक पूर्वापार पाठांत बदल केलेला मला माहित आहे.

**सूतशेखर पाठ एकुलता एक–**

जुन्या ग्रंथात काहीं काहीं कल्पांचे दोन, चार, पांच असे निरनिराळे पाठ सापडतात. पण सूतशेखर रसाचा एकच पाठ आहे. आमच्या वाचनात पूज्यपादाचार्यांच्या हस्तलिखित ग्रंथात सूतशेखराचा निराळा–दुसरा पाठ मिळाला. तो वैद्य मुकुंदराव यांना मी दाखविला. तो त्यानीं टिपूनही घेतला आहे. आता त्यांनी स्वतःचा नवीन पाठ बसवून नव्य सूतशेखर तयार केला. हे काम सोपे नाही. कोणताहि कल्प तयार करताना त्यातील औषधांच्या गुणधर्मांचे ज्ञान असावे लागते. आणि त्या त्या द्रव्यांच्यां गुणधर्मांचा प्रत्यक्ष अनुभव असणे हेही आवश्यक असते. द्रव्यांची ओळख, गुणधर्मांचे ज्ञान व अनुभव ही त्रयी साध्य झाल्याशिवाय कल्प बनविता येत नाही. वैद्य मुकुंदरावांना ही त्रयी साध्य असल्यामुळे ते नव्य सूतशेखर हा कल्प करु शकले.

त्यांनी या नव्य सूतशेखराचे गुणधर्म अनेक प्रकारांनी वर्णन केले आहेत. ते स्वतः अनुभव घेऊन लिहिले असल्यामुळे तो कल्प वैद्यांनी निर्धास्तपणे वापरण्यास हरकत नाही असे वाटते.

क्षमस्व:–

कृपया या पुढील मजकूर पुढील पृष्ठाच्या मागे पहावें.

॥ श्री ॥



शके १८९८ अनल नाम संवत्सरे भाद्रपद पूर्णिमा, प्रौष्ठपदी सौम्यवासरे।

चरकं सुश्रुतं चैव तथा संस्मृत्य वाग्भटं।
मुकुन्दः कुरुते नव्यं मौलिकं सूतशेखरम् ॥

षोडशपुरे भिषग्वरः मुकुन्दराजः तपसां त्रयं आयुर्वेदे परमादरेण परिश्रमपूर्वकं ग्रंथालोडनं, लेखनं, नूतनानि भेषजानि, रोगनिर्मूलकरीं चिकित्सां तथा संशोधनं च कुरुते। रसराजलक्ष्मी ग्रंथसंशोधनार्थं एते पुण्यपत्तनं आनन्दाश्रमसंस्थायां सन १९४५ काले समागच्छन्। तदा तत्र आवयोःमैत्री संपन्ना। तदाप्रभृति तेषां अग्रजसदृशीस्नेहधारा मम ज्ञानवर्ति उद्दीपयति। कार्यवशात् गतःअहं द्वित्रिवासरात् ऊर्ध्वं षोडशपुरम्। वैद्यवराणां नव्यं अपत्यं नव्यसूतशेखरग्रंथं तदा अपश्यम्। तदानीन्तने काले ज्ञानेशैः प्राकृतानां कृते ज्ञानेश्वरी लिखिता। इदानीन्तने काले आयुर्वेदप्रान्ते भिषग्वरैः नूतना, समुचिता, अगदापहारिणी ज्ञानेश्वरी इव निर्मिता इति मन्ये।

सर्वत्र अस्य ग्रन्थस्य प्रसारो भवतु इति धन्वन्तरिं प्रार्थये।

**वैद्य श्री. वि. भिडे**
काव्यतीर्थ, आयुर्वेदभिषग्।
६६७, नारायण पेठ, पुणें-३०.

---

॥ श्री ॥

या वैद्यक शास्त्रांत उतरणाऱ्या प्रत्येक व्यक्तीनें, त्रिविध शिष्यबुद्धि, लक्षांत घ्यावी. तसेंच या शास्त्रावरील विविध लेखकांनी लिहिलेलीं पुस्तके संग्रहित करतांना, या पुस्तकालाही संग्रहामध्यें अवश्य स्थान द्यावें असें या वैद्याला वाटतें.

**वैद्य आत्माराम वामन दातार**
आयुर्वेदाचार्य
पार्वती निवास महात्मा गांधी पथ,
मुलुंड (पश्चिम) मुंबई नं. ८१.

आयुर्वेदीय रसायन कल्पांत काहीं कल्प असे आहेत की त्यांचे कार्यक्षेत्र फार मोठे आहे. अनुपान–भेदाने त्यांचा वापर अनेक रोगांत करता येतो.

" सर्व रोगे वसंतः " असे सुवर्णमालिनी वसंताच्या गुणधर्मात सांगितले आहे. तो अनुपानपरत्वे अनेक रोगांत कार्य करतो. सूतशेखर हे औषधहि अनेक रोगांत कार्य करणारे आहे. असा अनुभव येतो. आधुनिक–वैद्यकातील काहीं औषधे अशी आहेत, त्यास " ब्रॉड स्पेक्ट्रम " असे म्हटले जाते. असे आयुर्वेदातहि कांहीं आहेत. त्यापैकी सूतशेखर हे एक आहे. वैद्य गायकवाड यांनी हाच दृष्टीकोन ठेवून नव्य सूतशेखर तयार केला आहे. याचा फायदा अनेक वैद्याना घेता येईल व त्यांचेकडून अनेक रुग्णांना प्राणदान दिले जाईल.

वैद्यराज गायकवाड यांनी अत्यंत कष्ट करून तसेच आपल्या चातुर्याने व संशोधक बुद्धीने हे औषध तयार केले. तसेच ते पुस्तकरुपाने प्रसिद्ध केले त्याबद्दल धन्यवाद !

त्यांच्या हातून असेच आयुर्वेदीय-ग्रंथ निर्माण व्हावेत अशी धन्वन्तरी चरणी प्रार्थना.

आपला,

**वैद्य नृसिहाचार्य बागेवाडीकर**

आयुर्वेदचिकित्सक

माजी प्रधान चिकित्सक,

शेठ सखाराम नेमचंद जैन रुग्णालय, सोलापूर.

# नव्य सूतशेखर
# आणि
# शतयोग प्रबंध

लेखक- वैद्य कविराज मुकुंदराव अंबादासजी गायकवाड.
१/१४ ई, आनंद धाम, मुरारजी पेठ, पूना रोड, सोलापूर-२.

नव्य सूतशेखर आणि तत्सहाय्यक औषधांचा किंवा त्यांचे बरोबर योजिल्या गेलेल्या शंभराचेही वर संख्या असलेल्या सहयोगी औषधांचा हा प्रबंध वैद्यवर्ग आणि जनता जनार्दना पुढें ठेवीत आहे. महाराष्ट्रांत सूतशेखर या औषधाचे नांव माहीत नाही असा वैद्य किंवा सुशिक्षित माणूस सापडणार नाही. असें हे प्राचीन कालापासून सर्वांच्या परिचयाचे असलेले औषध आहे. खेडचापाडचांतूनही "पित्ताची मात्रा" या नांवानें हे औषध ओळखले जाते. सध्या तर हा सूतशेखर अखिल भारतातील सर्व प्रांतातून सर्व व्याधींचे चिकित्सक मुक्त हस्ताने वापरत असल्याचे आढळून येते. इतके हे सर्वसामान्य व बिनधोक, कोणताही अपाय न होणारे निरुपद्रवी पण गुणाने मात्र अतिशय श्रेष्ठतम असे हे औषध आहे.

असें हे उत्तम औषध सध्याचे काळात सहजसुलभ वापरता यावे म्हणून सध्याचे युगाला अनुसरून अनुभवाने सुधारणा करून ते पुढीलप्रमाणें उपयोगांत आणले आहे. कोणाही चिकित्सकाला नित्याचे दैनंदिन चिकित्सा व्यवहारांत ते अतीव उपयुक्त वाटेल. सध्याचे महागाईचे दिवसांतही हा नव्य सूतशेखर मुक्तहस्ताने वापरून चिकित्सायश भरपूर मिळवता येईल.

नव्य सूतशेखर या शब्दातील नव्य हा शब्द अमरकोशांतील पर्याय नामावलीतील– प्रत्यग्रो, ऽभिनवो नव्यो नवीनो नूतनो नवः। नूत्नश्च . . . । या श्लोकांतून निवडून घेतला आहे.

सर्व सूतकल्पांत म्हणजे रस रसायनकल्पात शिखामणि म्हणजेच अग्रगण्य असें असणारे औषध म्हणजे सूतशेखर असा सूतशेखराचा शब्दशः अर्थ अभिप्रेत आहे.

## नव्य सूतशेखराचा पाठ–

कज्जली २० ग्रॅम, ताप्यहतताम्र १० ग्रॅम, लोह वैक्रांत भस्म १० ग्रॅम, बचनाग १० ग्रॅम, टंकणलाही १० ग्रॅम, धोत्राबीज १० ग्रॅम ही औषधे दिलेल्या क्रमानें एकत्र करून घोटून एकजीव झाल्या-वर त्यांत माक्याचा रस इतकाच घालावा कीं मिश्रण सहज घोटतां येईल. घोटून घोटून मिश्रण सुकत आले म्हणजे पुनः १ वेळ माक्याचा रस घालून घोटावे. याप्रमाणें २ वेळ घोटून पूर्णपणे सुकून पूड झाल्यावर मगच त्यांत त्रिकटु ३० ग्रॅम, चातुर्जात ४० ग्रॅम, उंची कचोरा १० ग्रॅम, चित्राश्म पिष्टी १० ग्रॅम, शंखभस्म १० ग्रॅम, कोंबडनखी १० ग्रॅम, उंटकटारीचे मूळावरील सालीचा घन १० ग्रॅम, बाळबेलमगज सुकवलेला १० ग्रॅम ही औषधे मिळवून चांगले घोटून एकजीव करावा व बाटलीत भरून ठेवावे.

कोणाला मात्रा म्हणजे गंधगोळ्या करून उगाळून घेण्याची आवड असल्यास उंटकटारीचे मूळांचा १/८ काढा करून त्यांत घोटून कांड्या वळून ठेवाव्यात किंवा गोळ्या हव्या असतील तर एक एक गुंजेच्या अथवा ½ गुंजेच्या गोळ्या वळून चांगल्या खड-खडीत वाळवून ठेवाव्यात.

या पाठांतील कज्जली ताप्यहततास्राादि द्रव्य समूहांचा खुलासा पुढे लिहिलेला आहे. गुणधर्म उपयोगाचे विवेचनांत नव्य सूतशेखराच्या मात्रेचा उल्लेख आहेच. साधारणता ½ ते २ गुंजा-पर्यंत प्रमाण निर्धारण विहित जाणावें.

## नव्य सूतशेखराचे गुणधर्म--

हा रसत: तिक्त, कटु व मधुर असून उष्णवीर्य आहे. विपाक-मधुर होतो. प्रभावानें घेरी-भ्रम-भोंवळ-अंधारीनाशक, पित्तशामक ज्वरघ्न अम्लपित्तनाशक, दाह, तृषा नष्ट करणारा आहे. वातक्षोभाने होणारे आक्षेपकाचा उपशम करणारा आहे. धनुर्वात, पक्षाघात, बालपक्षाघात, लेखकांचा हस्तकम्प, कलायखंज, अवबाहुक (अंस-शोष , विश्वाची, गृध्रसी, कटिवात (गर्डलपेन), गुदमार्ग स्नायूंचा स्तंभ, इत्यादि अनेक प्रकारचे वातरोगांवरही याचा प्रभाव दिसतो. मूर्च्छा घालविणारा असून, शूलघ्न व ग्राही कार्य करणारा आहे. संग्रहणीनाशक असून आमपाचक, छर्दिनियामक, अग्निदीपक, हिक्कानाशक, यकृतबल्य, पाण्डु, कामला व घातक पाण्डुरोगही नष्ट करितो. मूत्रपिंडाचे, गविनी, पौरुष ग्रंथीचे (प्रोस्टेट) कार्या-लाही या नव्य सूतशेखरानें जोम येतो. राजयक्ष्मानाशक असून मुदत घेणारे ज्वरांचा नायनाट करणारा, अम्लपित्तज जाठरव्रण व आंत्रव्रणांचे शोधन रोपण करणारा आहे. पित्ताश्मरीमुळे होणारा शूळ घालविणारा आहे. कास, श्वासघ्न व हृदयबल्य आहे. नानाप्रकारचे शोथही नष्ट करणारा आहे. श्लीपदावर याचें कार्य दिसतें. हृदय विकारावर सहाय्यक योगावरोबर योजिला असतां, आपलें वैशिष्ठ्य दाखवितो. रक्तवर्धक असून रक्त स्तंभकही आहे. गुल्मनाशक आहे. तसेंच जंत-कृमि, सूक्ष्म पूयोत्पादक जंतू-

चाही यानें प्रतिबंध होतो. नारू नष्ट करितो. स्थावर जंगम कृत्रिम- गर विषांचाही यानें नाश होतो. एवंच काय हा नव्य सूतशेखर बृंहण, वृष्य, बल्य, हृद्य, शरीरस्थ सर्व अंग प्रत्यंग, अवयवसमूह, अन्त: त्रास्वी ग्रंथीनाही कार्यप्रवण करणारा असून मानवाना दीर्घायुष्य प्रदान करणारा दिव्य रसायन योग आहे.

कोठल्याही व्याधीच्या सान्निपातिक अवस्थेत निर्माण झालेली आत्ययिक स्थिती आणीबाणीची वेळ या नव्य सूतशेखराच्या वारंवार दिलेल्या चाटणाने आटोक्यांत येते.

## उपयोग–

भ्रम-भोंवळ घेरी-चक्कर-झोले जाणें हे लक्षण अनेक पित्तोद्रेकी व्याधीत उत्पन्न होते. उदाहरणार्थ–विदग्धाजीर्णामध्यें पित्ताच्या गुळण्या, छातीत जळजळणें, मळमळून आंबट कडू उलट्या होणें या लक्षणासमवेतच बसले, झोपलेले असतानाही सर्व घर फिरल्याप्रमाणें भोंवळ घेऱ्या येऊं लागतात; अशावेळी हा नव्य सूतशेखर दुधांत अगर आलेरसांत आठ ते दहा वेढे उगाळून खडी साखरेची पूड मिळवून दिवसांतून ३-४ वेळ दिल्यानें थोड्याच वेळांत वरील सर्व लक्षणासह घेऱ्या येणें बंद होते. कांडी उगाळण्यास नसल्यास नव्य सूतशेखराची पूड ½ ते १ गुंज दुधासह किंवा आलेरस खडीसाखरेसह दिवसांतून ३-४ वेळ द्यावी.

पक्षवध–अर्धांगवात होण्यापूर्वी भ्रम–भोंवळ येणें, झोले जाणें कित्येकांना सुरू होते आणि मग केव्हां तरी मूर्च्छा येऊन एका अंगाडाची हालचाल करणें अशक्य होते. तेव्हां मोरावळ्यासह नव्य सूतशेखर वारंवार चाटवून उत्तम कार्यभाग होतो. मोरावळा नसेल तर दुधावरची साय अथवा लोणी नाहीं तर दूध साखरेसह

मिश्र करून हा नव्य सूतशेखर द्यावा. प्रमाण जरूरी प्रमाणें १ ते २ गुंजा नव्य सूतशेखर + २ ते ४ लहान चमचे मोरावळा, साय किंवा लोणी एकत्र कालवून थोडे थोडे वा बोट बोट चाटण दर पाच दहा मिनिटास मिश्रण संपेतो देत राहावें; म्हणजे ही भोंवळ नाहींशी होते. दूधसाखेरबरोबर द्यावयाचे झाल्यास घोटभर कोमट दूध त्यांत चमचाभर साखर आणि नव्य सूतशेखर $\frac{1}{4}$ तें $\frac{1}{2}$ गुंज मिळवून दिवसांतून ४–६ वेळ देत राहावें. **सफरचंदाचे (सेवाचे) सरबतासह** वरील प्रमाणेच नव्य सूतशेखर दिल्यानें चांगला उपयोग दिसतो. या स्तंभांत फक्त मूर्च्छेसंबंधी विचार आहे. पक्षवधाचे स्तंभांत पक्षवधावरचा नव्य सूतशेखराचा उपयोग पुढे लिहिला आहे.

मधुमेहामध्ये भोंवळ घेऱ्या येणे व पुढें मूर्च्छा ही लक्षणे उत्पन्न होतात, तेव्हां दुधाबरोबर नव्य सूतशेखर ८–१० वेढे उगाळून चाटवावा; किंवा $\frac{1}{4}$ ते $\frac{1}{2}$ गुंज एकावेळी घोटभर कोमट दुधासह याप्रमाणे दिवसांतुत ४–६ वेळ द्यावा.

रक्तदाब वाढला असतांही घेरी मूर्च्छा हा उपद्रव होतो. तेव्हां नव्य सूतशेखर २ गुंजा, **सर्पगंधाचूर्ण** १ गुंज एकत्र करून त्याचे सहाभाग करावेत आणि एकेक भाग **डाळिंब पाक** किंवा **डाळिंबाचे अवलेहाबरोबर** दहा पांच मिनिटाला एकवेळ चाटवावें; घेरी, मूर्च्छा नष्ट होते.

रक्तदाब न्यून असतांनाही घेऱ्या भोंड येते. चालतांना पडतो कीं काय असे वारंवार वाटते. झोंक जातात. अशा अवस्थेत नव्य सूतशेखर आलेरस मधासह वरीलप्रमाणेच चाटण बनवून वारंवार द्यावा किंवा तूप साखर दूध साखरेतून अथवा केवळ दुधाबरोबर अगर पाण्यासहही द्यावा.

कांहीं नेत्र रोग्यामध्यें डोळ्यापुढें अंधेरी येण्याचे लक्षण निर्माण होते अशा वेळीं नारळाचे पाण्याबरोबर हा नव्य सूतशेखर एकावेळी ½ गुंज ते १ गुंज याप्रमाणें दिवसांतून ३ ते ४ वेळ दिल्याने बरे वाटतें. रक्तदाब वाढला असतां कांहींना डोळ्यापुढें मंद दिसू लागते, तेव्हां नव्य सूतशेखर १ ते २ गुंजा + **नेत्र्य गण** ४ ते ८ गुंजा एकत्र करून दिवसातून ३ वेळ अगर ४ वेळ **गुलकन्दासह** द्यावा. ३ ते ७ दिवसांत डोळ्यांना चांगले दिसूं लागते आणि रक्तदाबही उतरून सम्यक् होतो. जरूरीप्रमाणें यांतच ¼ ते ½ गुंज सर्पगन्धा-चूर्ण मिळवल्यास चालते.

कर्णस्त्राव रोग जीर्ण झाला असतांही घेरी, मूर्च्छा व प्रसंगी धनुर्वातासारखे आक्षेपक येणे, किंवा भोंवळ येणे सुरू होते. अशा वेळींही **बेलाचे मुरंब्यासह** किंवा **बेल पाकासह** नव्य सूतशेखर १ ते २ गुंजा दिवसांतून ३–४ वेळ किंवा जरुरी प्रमाणे वारंवार सूक्ष्म मात्रेने योजावा. मुरंबा नसेल तर दूध साखरेसह योजावा.

हृद्रोगापैकीं ज्यांमध्यें नाडी मधून मधून लुप्त होऊन हाताला कांहीं क्षण लागत नाहीं ( Extra Systole किंवा Missed beet = ठोका चुकणे, ठोका गाळणे ) म्हणजे ठोके मोजतांना ६–७–८ वे ठोक्यानंतर नाडी ठोका गाळते. अशा रोग्याना जरी कांहीं विशेष घबराटीचे किंवा कांहीं धोका आहे असें जरी वाटत नसलें, तरी कांही प्रसंगी हें ठोके गाळणें वारंवार प्रतीत होऊं लागलें म्हणजे मग मात्र रोग्याला चक्कर, बेहोषी तर कांहीं वेळा कांही काल आक्षेपक आदींचे वेग येऊ लागतात. अशा अवस्थेत नव्य सूतशेखर ३ गुंजा + **अर्जुनवृक्ष साल्लीचा घन** ६ गुंजा + **शृंगभस्म** ३ गुंजा = ३ पुड्या करून एकेक पुडी दिवसांतून ३ वेळ किंवा नव्य सूतशेखर ३ गुंजा + **लक्ष्मीविलास** ३ गुंजा = ३ पुड्या करून एकेक दिव-

सांतून ३ वेळ मध, दूध किंवा नारळाचे पाण्यासह दिल्यानें गुण दिसतो व असले नाडी वैषम्यही पुष्कळच कमी वेळा दिसू लागते. सातत्यानें दिल्याने बहुधा नाहीसेही होते.

कांही तरुण व तरुणी अशक्त किंवा कोवळ्या मनाच्या अशा आढळतात कीं थोड्याशाही मानसिक आघातानें त्यांच्या हळव्या मनावर परिणाम होऊन त्यांच्या डोळ्यापुढे अंधेरी येते; व उभ्या उभ्याच बेहोष होऊन पडतात. हा प्रकार बहुधा अशा व्यक्तींच्या रक्त-वाहिनी नलिकांच्या भिंती दुबळ्या असतात. त्या तितक्या चिवट नसतात म्हणूनच असें घडतें. त्याचा परिणाम म्हणून रक्तदाब न्यून होऊन हृदयाकडे रक्त जोराने खेंचले जात नाही. अशांची हृदयग-गतीही थोडी मंदच असते. त्यांचे शरीरस्थ शिरांची संकोचन होण्याची शक्ति त्या मानसिक विशिष्ट अवसादक अवस्थेत शिथिल पडलेली असते; म्हणून मेंदूकडे रक्त न पोहोंचल्यामुळें ही अशी मूर्च्छा येते. त्याकरितां हा नव्य सूतशेखर २ गुंजा + सूक्ष्म मल्लसिन्दूर १ गुंज एकत्र करून आलेरस मधासह एकजीव करून जिभेवर लावावे, म्हणजे ओलाव्यानें जिभे खालच्या रक्तवाहिनी द्वारां ते मिश्रण-चाटण शोषलें जाऊन २-३ चाटणानंतर रोगी शुद्धीवर येतो; नंतर दिवसातून ४ वेळ फक्त नव्य सूतशेखर लक्ष्मी विलासा-बरोबर दूध, कॉफी, चहासह एकादे सप्तक देत राहावें. इमर्जंन्सीचे वेळी शुद्धीवर लौकर आणण्याकरितां औम वायू (अमोनिया वायु) हुंगवणें म्हणजे ओलाचुना + नवसागर एकत्र केल्याने व बाटली जोराने हलवण्याने औमवायू निर्माण होतो. तो नाकाजवळ धरल्याने शुद्ध येते किंवा कडक मोहरीच्या अर्काचे हुंगवण्याने तर तात्काळ हरपलेली शुद्ध येते; मग नव्य सूतशेखराचा वरीलप्रमाणे उपयोग करावा.

हल्ली अँटी बायोटिक इंजेक्शनामुळें कांही व्यक्तीना ते असात्म्य होऊन मूर्च्छा येते. कांहीना उलट्या जुलाब होतात, व हृदयांत आवळल्याप्रमाणें होऊन बेहोषी येते. अंग गार पडते. हातापायातील अवसान जाऊन मोठी भीतीप्रद कठीण अवस्था उत्पन्न होते. काहींना शीतपित्ताच्या गांधी (रॅश) सर्वांगावर उत्पन्न होऊन त्या धावड्याना विलक्षण खाज असते. रोगी अक्षरशः वेड्या पिशाप्रमाणें सर्वांग खाजवीत राहातो. अशा सर्व प्रकारांत नव्य सूतशेखर २ गुंजा + **वंशलोचनाचे भस्म** ४ गुंजा, थोडी साखर मिळवून पाण्यासह दर पांच दहा मिनिटास एकवेळ याप्रमाणें या मिश्रणाचे पांच सहा भाग पाडून एकेक भाग देत जावा. उपशम दिसू लागतो; किंवा नव्य सूतशेखर २ गुंजा + **धमासा** २ गुंजा + **खाण्याचा सोडा** २ गुंजा + **कांव** १ गुंज = १ पुडी याप्रमाणे ४ वेळ दर दोन तासास एकदा याप्रमाणें द्यावे. बरे वाटते. नंतर दूध, कॉफी द्यावी बरे वाटते.

कांहीं हळव्या मनाच्या व्यक्तीना दुसऱ्यांचे जखमेतून रक्त वाहत असलेले पाहून डोके गरगरू लागते व ती व्यक्ति बेशुद्ध होऊन पडते. अशा वेळी आले रस मधासह अथवा ग्लुकोसाखरेसह किंवा साध्या साखरेसह नव्य सूतशेखराचे चाटण जिभेवर करतांच ३-४ चाटणातच शुद्ध येते.

कांहीं कारणाने एकदम खूप घाम फुटला असतांही लक्ष्मी विलासाबरोबर हा नव्य सूतशेखर दिल्याने तात्काळ घाम बंद होऊन बरे वाटते व पुढची भ्रम भोंवळ मूर्च्छेची लक्षणे प्रकट होत नाहीत.

एखादे बंद सभागृह, चित्रमंदिरे आदि ठिकाणी मनस्वी गर्दी होऊन एखाद्यास दमघुट होते, जीव कासावीस घाबराघुबरा

होऊन मूर्च्छा येते, तेव्हां त्यालाही मोकळ्या हवेंत आणून या नव्य सूतशेखराचे ग्लूको वा खडीसाखरेसह मिश्रण दिल्याने तात्काळ बरे वाटते.

विजेचा शॉक बसून एखाद्या इसमास मूर्च्छा आली असतां, त्यास २ गुंजा नव्य सूतशेखर मधांत किंवा साखरेचे पाकांत नाही तर ग्लूको साखरेशी मिळवून जिभेवर लावल्याने जिभेखाली त्याचे शोषण होते; आणि सूक्ष्म रक्तवाहिन्यामार्फत मेंदूकडे पोहोंचून मेंदूला उत्तेजन येते आणि तो इसम शुद्धीवर येतो. मग त्यास कोणतेही उत्तेजक पेय, कॉफी वगैरे देऊन पूर्ण स्वास्थ्य मिळवून देता येते.

ऊष्माभिघात म्हणजे उन्हाची झळ लागून भोंवळ, घबराट, तीव्र गळाठा, शीर:शूल, ज्वर, घाम फुटणें, लघवी कमी होणे व मूर्च्छा आदि लक्षणे होतात. त्यावर नव्य सूतशेखर कांद्याचे रसाबरोबर द्यावा आणि मानेला सुधा बिंदु मलम चोळावे.

एखादे तीव्र विष पोटांत जाऊन बेशुद्धी आली असतां, आणि हात, पाय, अंग गार पडले असतां केवळ धुगधुगी तेवढी शिल्लक असतांही; हा नव्य सूतशेखर विलक्षण कार्य करितो. हा देण्यापूर्वी प्रथम आमाशय धावनाने पोट धुवून साफ करून घ्यावे. मग याचे चाटण मधातून दिल्यास अथवा उत्तेजक पेयासह जिभेवर सोडल्यास हळूहळू रोगी शुद्धीवर येतो. मात्र आमाशय धावनाचा उपयोग दाहक विष पोटांत गेल्यास, रोग्यास ज्वर असतां आणि हृदयरोग असल्यास, जुनाट कास असल्यास करू नये. रक्तांत भिनून गेलेल्या विषावरही या धावनाचा उपयोग होत नाही. पण नव्य सूतशेखराचा मात्र उपयोग दिसतो. त्याचे कारण या नव्य सूतशेखरांतील चित्राश्मपिष्टी, ताप्यहृतताम्र, लोहवैक्रान्त भस्म, ब्रह्मदंडी व माका यांचे-

मुळे हे विषघ्न कार्य प्रत्ययास येते. रक्तगत विषारांवरच नव्हे तर अगदी अस्थि, मज्जात धातुगत विषही यानें नष्ट होते. विषघ्न प्रभावाची उदाहरणे–

सोमल अधिक प्रमाणांत पोटात गेल्यास जठरांत्रादींचा तीव्र दाह होतो. अतिसार, वांति व त्यातून रक्त पडू लागते. दृष्टीचे तेज जाऊन आंधळेपणा येतो, तीव्र तहान लागते; हात पाय गार पडू लागतात. लघवीला होत नाहीं. तिडीक–मूत्रकृच्छ्र लागते. डोळे लाल तंबूर होतात. घेरी, चक्कर येते. स्नायूमध्ये पेटके आदि लक्षणें होतात. या विषारावर नव्य सूतशेखर दिल्याने विषबाधा उतरते. दूधांत तूप घालून ते दूध अग्नीवर गरम राहील असें ठेवावे, आणि ते दूध कोमट कोमट $\frac{1}{2}$ ते १ कप व नव्य सूतशेखर $\frac{1}{2}$ ते १ गुंज एकत्र करून प्यावयास द्यावे. याप्रमाणें वारंवार देत राहावें. प्रथम प्रथम उलटीवाटे दूध पडून जाते व अशा रीतीने बरेचसे विष निष्क्रीय बनून बाहेर पडते. पेटके, मुंग्या येणे, हातापायाचा गारवा ही लक्षणें नष्ट होऊ लागतात. पोटातील दाह, तहान कमी होत जाते. रक्त येणेही बंद होते. अशा रितीने एक एक लक्षण लुप्त होत होत विषार नष्ट होऊन झोप येऊ लागते. साधारणपणे ८–१० वेळ औषध पोटांत गेल्याने विषबाधा उतरते.

अशाच प्रकारे विषारी जीवाणू दंशजन्य विषारावरही या नव्य सूतशेखराचा उपयोग होतो. गरविषारावरही दुधाबरोबर अथवा नारळाच्या पाण्याबरोबर देऊन उपयोग होतो. अन्नविष, अर्गट बाजरी, गहू आदि धान्य खाऊन बाधल्यास उलटचा जुलाब गळाठा, घेरी आदि विकार होतात; तेव्हा हा नव्य सूतशेखर मोरावळा, डाळिंब पाक, बेलाचा मुरंबा, नारळाचे पाणी इत्यादि पैकी मिळेल त्या एका अनुपानासह द्यावा आणि दुधांत उगाळून मलमल

फडक्यांत घेऊन ४-६ थेंब नस्यही द्यावें. कुत्रे, उंदीर, चिचुन्द्री, मांजरादींचे चावण्यामुळे बाधा झाल्यास, विषघ्न गणांतील औषधीसह द्यावा. केवळ विषावरच नव्हे तर ज्वरादि कोणत्याही रोगामुळे शरीरांत खेळणारे आमविष (टॉक्सीन) ही या नव्य सूतशेखराने नष्ट होते.

## दीर्घ मुदतीचे ज्वरावर प्रभाव–

नव्य सूतशेखराचा आमविषपाचन करण्याचा फार उत्तम व उपयुक्त धर्म आंत्रिक (टॉयफॉईड) ज्वरासारख्या दीर्घ मुदत घेणारे ज्वराचे चिकित्सेत प्रत्ययास येतो. केवळ एकटा देऊनहि त्याचे ज्वरघ्न कार्य दिसतेच, पण पुढील ज्वरघ्नपंचक योगानें ३-४ दिवसांतच ज्वरमुक्तीचे यश पदरात पाडून घेतां येते.

नव्य सूतशेखराची पूड ३ गुंजा
लक्ष्मी विलास १½ गुंज
चंद्रकला रस १½ गुंज
महालक्ष्मी नारायण १½ गुंज
प्रवाळपिष्टी ३ गुंजा

एकत्रून = ४ पुड्या करणें.

एकेक पुडी दिवसांतूत ४ वेळां नारळाच्या घोटभर पाण्यासह १ ते २ गुंजा गोदंती भस्म प्रत्येक वेळी मिळवून दिल्यानें दीर्घ मुदतीचे कोणतेही ज्वर निश्चित खाली येतात, आणि या योगाने ज्वरांतील सान्निपातिक उपद्रवही नष्ट होतात. नवीन उत्पन्न होत नाहीत.

आंत्रिक ज्वरासारख्या दीर्घ मुदत घेणारे ज्वराचे आमविष सर्व शरीरांत खेळत असतां, हल्ली त्यावर वापरले जाणाऱ्या

क्लोरोमायसेटीनसारख्या अति तीव्र, तिक्त कडूरसाचें औषध कोणा कोणाला न मानवता त्याचे दुष्परिणामजन्य आणखी एक आमविष त्याचे जोडीला मिसळून; रोग्याची तगमग, बडबड आदि वाढून रोग आणखी उग्र स्वरूप घेतो. अशावेळी या नव्य सूतशेखराचे चाटण पाच पाच मिनिटानी दिल्याने लागलीच उपशम झालेला दिसून येतो. वर निर्देशिलेल्या ज्वरघ्नपंचक मिश्रणाचा ग्लूको साखरेबरोबर किंवा गोदंती भस्माबरोबर किंवा नारळाचे पाण्याबरोबर उपयोग केल्यास चालते.

## ग्राही कार्य–

नव्य सूतशेखराचा ग्राही प्रभाव पुढीलप्रमाणें दिसतो. अतिसार, भसरट शौचाला होत असल्यास नव्य सूतशेखर ३ गुंजा + **शृंग्यादिचूर्ण** १२ गुंजा एकत्रून तीन पुड्या कराव्यात. दिवसातून तीन वेळ पाण्यासह द्याव्या. केवळ तांदुळाचा भात व साखर पथ्य द्यावे. एकच दिवसात अतिसार थांबतो. शृंग्यादि ऐवजी **ग्राहीगणा**-**सह** द्यावा. जलद गुण दिसतो. आमांश–प्रवाहिका, संग्रहणी यावर नव्य सूतशेखर ३ गुंजा + **आनन्दभैरव** ३ गुंजा + ग्राहीगण १२ गुंजा यांच्या तीन पुड्या करून त्या दिवसांतून ३ वेळ पाण्यावरोबर द्याव्यात. दोन किंवा तीन सप्तकातच आरोग्य लाभ होतो. अजीर्ण विषूचिका (Gastro–enteritis) आणि जानपदोध्वंसी विषूचिका (कॉलरा) यावर नव्य सूतशेखर ३ गुंजा + लक्ष्मी विलास ३ गुंजा एकत्र करून त्या मिश्रणाच्या तीन पुड्या कराव्यात आणि एकेक पुडी दर अर्ध्या तासास नारळाचे पाण्याबरोबर द्यावी.

गर्भिणीच्या उलटचा जुलाबाचा बंदोबस्त नव्य सूतशेखर ½ गुंज डाळींबबीजाचा रस १ लहान चमचा व पुदिना पानांचा रस

½ लहान चमचा एकत्रून त्यासह दिल्यानें चटकन होतो. दिवसांतून ३–४ वेळ याप्रमाणें द्यावें. वांती नष्ट होण्याकरितांही याचप्रमाणें पण दिवसांतून कमीतकमी ४–६ वेळ द्यावें किंवा ग्लूको साखरेसह नव्य सूतशेखर दिल्याने ही वांती बंद होते.

पादेलोणाचा खडा लिंबू रसासह सहाणेवर ८–१० वेढे उगाळावा, नंतर त्यातच विवा ४–६ वेढे उगाळावा, नंतर त्यांत नव्य सूतशेखर ¼ गुंज मिळवून कॉलऱ्याचे रोग्यास चाटवावे. याप्रमाणें ४–६ वेळ (दर आध्या तासास एकदा याप्रमाणें ४–६ वेळ) चाटवल्यानें उलटचा जुलाव थांबून, बंद झालेली लघवी सुरू होते आणि घशाची कोरड पडणे व पोट दुखणे, पेटके येणेंही बंद होते.

हिक्केवर (उचकी) कावेची पूड आणि धात्री म्हणजे आवळकाठीचूर्ण प्रत्येकी २ गुंजा एकत्रून त्यांत ¼ गुंज नव्य सूतशेखर मिळवून पाण्यासह दिल्याने ती थांबतेच. काव म्हणजे गेरू व धात्री नसल्यास आवळ्यांचे मोरांव्यासह नाहीतर केवळ दूध साखरेशी द्यावे, थांबते.

दाह, तृष्णेवर वाळा सरवत, दाडिमावलेह, नारळाचे पाणी यापैकी एकातून नव्य सूतशेखर पाव गुंज दिवसांतून ३ वेळ द्यावा. धन्याचा फाण्ट, बडिशोपेचा किंवा बाळंतशोपेचा ऊर्ध्वपातित अर्क एकतोळा व नव्य सूतशेखर ¼ गुंज मिळवून दिल्यानेही दाह, तहान बंद होते. केवळ खडीसाखरेशी दिल्यानेही दाहतृषा नष्ट होते.

अति मद्यपान करणाऱ्या लोकांना आरंभी पोटांत व छातीत जळजळ, दाह होऊ लागतो. ही तलखी दुपारून व रात्री ८ ते ११ यावेळी फार असते. याचे कारण जठर व आंतड्यांत दारूचे तीक्ष्ण उष्ण गुणामुळे तेथील अन्तस् त्वचेचा क्षोभ होऊन, ती खरवडल्या

प्रमाणे होऊन तिथे शोथ व लाली वाढलेली असते. पोटदुखी, वेदना होतात. अशा अवस्थेत नव्य सूतशेखर तूपसाखरेसह दिवसांतून ४-६ वेळ द्यावा; किंवा नव्य सूतशेखर प्रवाळपिष्ठीसह अथवा प्रवाळ पंचामृतासह तूप साखर अगर दूधाशी, खडीसाखरेशी दिल्याने तात्काळ उपशम होतो. पोटदुखी, वांती, विरेकादि लक्षणे अशा मद्यप्याचे ठिकाणी जादा असल्यास नव्य सूतशेखर १ गुंज + विश्वाणिगुडा २ गुंजा ते ४ गुंजा मिळवून पाण्यासह दिवसांतून ३–४ वेळ द्यावे; उपशम होतो.

## अम्लपित्तावर प्रभाव -

आम्लपित्ताचे व्याधीत हा नव्य सूतशेखर दुधाबरोबर द्यावा. मोरावळा, डाळिंब पाक अथवा दाडिमावलेह यापैकी एकातून दिल्याने कार्यभाग होतो. याचेबरोबर प्रवाळपिष्ठी किंवा प्रवाळ पंचामृत दिल्याने गुणवृद्धि होते. अशाच प्रकारे आम्लपित्तज जाठरव्रण, आंत्र व्रणावस्था होऊन अन्नद्रवशूळ, परिणामशूळ जडतो; त्यावरही याचा चांगला उपयोग होतो.

आम्लपित्त, अन्नद्रवशूळ, परिणामशूळ, जरत् पित्त, विदग्धाजीर्ण आदि व्याधीवर पुढील प्रयोग फार उत्तम काम देतो. एका लिंबाच्या चार फाकी कराव्यात. एकेकीवर क्रमाने मीठ, हळद, सुंठ, साखर यांची चूर्णे त्या फाकीवर बसतील तेवढी सारवून एकेक फाक सुमारे अर्धा फर्लांग चालून आल्यानंतर रोग्यास चोखून खाण्यास द्यावी. दररोज सकाळी हा उपक्रम ३ दिवस ओळीने केल्यानंतर, मग नव्य सूतशेखर १ गुंज, दीपक पाचकचूर्ण ८ गुंजा एकत्र करून पहाटे खाण्यास देऊन वर सुमारे कपभर गरम पाणी प्यावयास द्यावे. याप्रमाणें तीन दिवस द्यावे. या सहा दिवसांत जेवणांत

फक्त तूप भात, ज्वारीची भाकरी, साधी गव्हाची पोळी, वरण व कमी तिखट असलेली एखादी पथ्थकारक भाजी असें साधे अन्न द्यावे. आंवट व तळीव वर्ज्य करावे. सातवे दिवशी नेहमीचे जेवण घ्यावयास द्यावे. व्याधी नष्ट होते.

पित्ताश्मरीजन्य शूळामध्ये नव्य सूतशेखर नारिकेल लवणा सह योजावा. पित्ताश्मरीवर देखील नव्य सूतशेखराचा प्रभाव दिसतो. नव्य सूतशेखर २ गुंजा करीर (नेपताड) मूळावरील साल वायवर्ण्याची साल, पारव्याची विष्ठा हे जिन्नस प्रत्येकी २ गुंजा एकत्र करून दिवसांतून ४ वेळ दिल्याने उपयोग दिसतो.

पित्ताश्मरी हा विकार कां जडतो व कोणाला जडतो याचे निरीक्षण केल्यास असें दिसतें कीं, व्यायाम न करणारे, वसून राहाणारे, तळीव व जडान्न वारंवार खाणारे, वानस्पतिक तुपाचा वापर मुक्त हस्ताने करणारे, दारू, तिखट मसाले, तळीव पुऱ्या, बटाटे आदि कंद भाज्यांचा वापर फार करणारे, मांसाहार, अंडी, लोणची विनिगार (शुक्त), वॅनिला एसेन्स, टमाटे यांचा वापरही मोठ्या प्रमाणांत करणाऱ्या लोकांना हे पित्ताशयाचे विकार जडतात. विशेषतः पुरुषांपेक्षा स्त्रियांमध्ये हे विकार जास्त आढळतात. तेही मध्यमवयीन स्त्रियांमध्ये वहुत करून आढळतात. अति उपवास करणाऱ्या स्त्रियांतही आढळतात. पित्ताश्मरीनें बराच मोठा आकार घेतल्यास तो कागदी मोठ्या लिम्बासमान दिसतो. त्याचे पृथःकरण केल्यास त्यांत खट (कॅलशियम) आणि पैत्तवाचे (कोलेस्टोरॉल) रवे आढळतात.

पित्ताशयाचे विकारांत चिकित्सकाचे मुख्य लक्ष्य रोग्याची वेदना थांबविणे आणि रोगाचे आवेगाला रोखणे हें असावे.त्याकरितांही या नव्य सूतशेखराचा उपयोग उत्तम होतो. नव्य सूतशेखर ६

गुंजा + वेदनाशामक मिश्रण ६ गुंजा मिळवून त्याच्या ६ पुड्या कराव्यात. एकेक पुडी दर अर्ध्या तासास मधासह अथवा आलेरस मधासह चाटण बनवून द्यावी. वेदना थांबून रोग्यास बरे वाटते.

पित्ताश्मरी, आत्ययिक म्हणजे तीव्र पित्ताशयशोथ, चिरकालीन पित्ताशयशोथ, पित्ताश्मरी शूल आणि पित्ताशयाचा अर्बुदरोग या पित्ताशयाचे रोगात नव्य सूतशेखर १ गुंज, गुलाबाचे देशी पद्धतीने तयार केलेले अस्सल अत्तर १ थेंब एकत्र करून साखरेबरोबर दिवसांतून ३ वेळ दिल्याने उत्तम उपशम दिसतो.

पित्ताशयाचे रोगामध्ये पित्तस्त्रावी आणि पित्तशामक अशा औषधी अनुपानादि औषधी योगांचा उपयोग नव्य सूतशेखराबरोबर करावा. क्षार आणि लवणे पित्ताचा स्त्राव करणारी असतात. तूप पित्तशामक आहे म्हणूनच पूर्वाचार्यांनी घृतावर तिक्तरसांचे संस्कार करून त्यांचा उपयोग केलेला आढळतो. नव्य सूतशेखर गाईचे तुपासह किंवा तिक्तघृताशी (अ. हृ. चि. अ. १९- २ ते ७ व ८ ते १० श्लोक) दिल्याने पित्ताशयांतील रोगांचा उपशम होण्यास मदत होते. तिक्त घृताचा एक सोपा नमुना–विषमोगरी घृत -गाईच्या अगर म्हशीचे साजूक चमचाभर तुपात विषमोगरीचे कंदाचा सुमारे चण्याएवढा ओला तुकडा टाकून तळावा. चांगला खरपूस तळून निघाल्यावर तो तुकडा बाजूस करून केवळ तूप घ्यावे. हे तूप नव्य सूतशेखराचे अनुपानार्थ वापरावें. यानें पित्ताशयासंबंधीचे बहुतेक सर्व विकार जे मागे लिहिलेले ते तर नष्ट होतातच; पण पित्ताशयाचे अर्बुदावरही तन्नाशक परिणाम दिसून आलेला आहे. नव्य सूतशेखर १ गुंज व हे तूप १ चमचा याप्रमाणें एकत्र करून सकाळ सायंकाळ द्यावें; किंवा नव्य सूतशेखर १ गुंज + रत्नवैक्रान्त भस्म १ गुंज + विषमोगरी कंद घृत १ चमचा एकत्रून दिवसातून २ अगर ३ वेळ द्यावे.

अग्निमांद्य–भूक मंद झाली असतां नव्य सूतशेखर, आलेरस, मधासह किंवा सुंठ साखरेसह द्यावा; किंवा भाजलेल्या जिऱ्याची पूड व खडीसाखरेसह द्यावा; तीनच दिवसांत चांगली भूक लागते. तोंडाला रुची येते. आमाचें उत्तम पाचन होते.

पोटशूळ, आध्मान– पोटफुगी, मल मूत्रावरोध यांवर नव्य सूतशेखर १ गुंज + सर्जिका ३ गुंजा एकत्रून पाण्यावरोबर दिल्याने गुण दिसतो. दिवसांतून ३ वेळ याप्रमाणें एखादे सप्तक द्यावे. तीव्र विकारांत लौकर गुण दिसावा म्हणून **चिंचासोरक योग** सर्जिके ऐवजी योजावा.

**नव्य सूतशेखराचा संग्रहणीनाशक उपक्रम–**

नव्य सूतशेखर १ गुंज धण्याचे हिमासह अगर फाण्टासह दिवसांतून ३ वेळ सुमारे ३ आठवडे द्यावा, नंतर ताकामध्ये ४ गुंजा चित्रक मूळावरील सालीचे चूर्ण मिळवून त्यासह एकेक गुंज ४ आठवडे द्यावा, नंतर दोन आठवडे **फेनी खर्जूरवटीसह** पाण्याबरोबर सकाळ सायंकाळ दिल्यानंतर केवळ मधासह हा नव्य सूतशेखर चार आठवडे द्यावा; म्हणजे संग्रहणी रोग उपद्रवासह जातो. हा चिकित्सेचा उपक्रम संग्रहणीचे लक्षणास व उपद्रवास अनुलक्षून सहेतुक अवलंबिला आहे. कसे तें पहा– तृषा, अरुचि, मळमळ, अंधेरी आणि मुखपाक हीं लक्षणे पहिले तीन आठवड्याचे उपक्रमानें कमी होतात; नंतरचे चार आठवड्यांत अग्निमांद्य, मलमूत्रावरोध किंवा आमांश–प्रवाहिका, पोटफुगी, चिडखोरपणा, निद्रानाश आदि नष्ट होतात. तदनंतरचे दोन आठवड्यात चेहऱ्यावरील फिकटपणा, गळाठा, हृदयविकृति आणि दुबळेपणा नष्ट होतो. त्या नंतरचे चार आठवड्यांत गेलेला नैसर्गिक बांधीवपणा येऊन

तोंडावरील व हातापायावरींल सूजेचा टापसा, क्वचित कोणाकोणा संग्रहणीचे रोग्यात आढळणारी उन्मादावस्था व वांत्या होणें आदि सर्व लक्षणे संपुष्टांत येतात. पोट जड वाटणे किंवा पोट दुखणें बंद होते. आमांशावर एकाच दिवसांत प्रभाव दाखवयाचा असेल तर नव्य सूतशेखर १ गुंज + ½ गुंज अफू + १ गुंज ओला चुना एकत्र करून तीन भाग अथवा तीन गोळ्या कराव्यात, आणि रक्ती आंव असेल तर घरचे दह्याशी दिवसांतून ३ वेळ द्याव्यात; पांढरीं आंव असेल तर आलेरसासह ३ वेळ द्याव्यात.

## नव्य सूतशेखराचे कृमिघ्न कार्य–

नानाप्रकारचे कृमिविकारावर–गोलजंत, चपटेजंत, सूत्रकृमि, आंकड्या सारखेजंत आदि नानाप्रकारचे कृमि विकारावर नव्य सूतशेखर १ गुंज + घाणेरीच्या मूळावरील सालीचें चूर्ण १ गुंज एकत्र करून डाळिंबाचे मुळीचे काढ्याबरोबर सकाळ संध्याकाळ दिल्यानें ते नष्ट होतात. पुनः होत नाहीत. नव्य सूतशेखराबरोबर कृमिमुक्ति. योग योजिला असतां, जंताचे मग ते कोणत्याही प्रकारचें असोत भेंडोळेच्या भेंडोळें पडून जातात. चापट जंतांची माळच त्यांचें तोंडासह पडते. सूत्र कृमि, अंकुश कृमि, बडिश कृमि आदींचा फडशा पडतो आणि गुदवळीमधील तीव्र खाजरेपणा समूळ नष्ट होतो मात्र एखाद दुसरा आठवडाच कृमिमुक्ति योग नव्य सूतशेखराबरोबर योजवा. पुढे केवळ नव्य सूतशेखरच सुमारे सात आठवडे द्यावा.

खुरासानी ओव्याचे चूर्ण २ गुंजा + नव्य सूतशेखर १ गुंज एकत्र करून गुळ तिप्पट मिळवून, रात्री तांब्याच्या भांड्यांत ठेवलेले पाणी सुमारे छटाक घेऊन, त्यांत कालवून कृमिरोग्यास पाजवावे.

याप्रमाणें एक दोन आठवडे दिल्याने बहुतेक सर्व कृमींचा नाश होतो. जेवणात तिखट व कडू रसाच्या पदार्थांचा उपयोग करावा. असाच उपयोग किरमाणी ओव्यासह नव्य सूतशेखर दिल्यानें होतो. औषध दिवसांतून ३ वेळा द्यावे.

कांही कृमि रोग्यांचे श्वासांत विष्ठेसारखा दुर्गंध येतो, बोलतांना तर अशा व्यक्तीशी जवळ बसून बोलणे केवळ शिक्षाच वाटते. अशा त्या कृमिरोग्याला नव्य सूतशेखर २ गुंजा + कडूनिंब फुलांचे चूर्ण ४ गुंजा यांची एक पुडी रिकामे पोटी देऊन, अनुपान कडूनिंबाची पाने व काडचा किंचित पाणी घालून वाटून काढलेला रस सुमारे १ कप, चिमूटभर हळद पूड व भाजलेल्या जिऱ्याची पूड चिमूटभर मिळवून प्यावयास द्यावे. दुपारचे जेवणानंतर व रात्रीचे जेवणानंतर केवळ नव्य सूतशेखर मधावरोबर चाटून खाण्यास द्यावा. जेवणांत लसणीची फोडणी दिलेल्या व लसूण घातलेल्या भाज्या, आमटी, कोशिंबीर आदि द्यावेत. जेवतांना कांद्याच्या फोडी खाण्यास सांगावे.

अशाप्रकारें कृमिघ्न औषधानुपानासह वा सहपानासह नव्य सूतशेखराचा उपयोग केल्यानें त्या त्या औषधाना बल प्राप्त होऊन रोग प्रतिकार जलद करितां येतो. कृमिघ्न कार्य वाग्भट अष्टांग हृदयांतील सुरसादि गणामधील औषधानीही होते; पण या गणा-बरोबर नव्य सूतशेखर योजल्यास हे कार्य जलद घडून आल्याचे अनुभवास येते. मग त्या गणातील एक औषध अगर मिळतील तेवढी घेऊन त्यावरोबर नव्य सूतशेखर दिला तरी चालेल.

नारूचा कृमि– नारू झाला असतां तीव्र ज्वर, शीतपित्ताच्या गांधी सर्वांगभर येणें, वांत्या होणे आदि उपद्रव होऊन हाती पायी बहुधा भाजल्याप्रमाणें फोड येऊन पुढे तारवाचा तंतु दिसू लागतो.

म्हणजे फोड फुटून व्रण होऊन त्या व्रणाचे तोंडातून नारूचा तंतु दिसू लागतो. अशा या त्रासदायी रोगानें माणूस पछाडला म्हणजे त्याला हिंडणे फिरणें अशक्य होते. यावर नव्य सूतशेखर १ गुंज + नवसागर ४ ते ८ गुंजा एकत्र करून नारळाचे पाण्याबरोबर अथवा साध्या पाण्याशी द्यावा. वंक्षण संधीत, शिवणीत अगर टांचेतही नारू झाला असतां फार त्रासदायी होतो; कारण अशा ठिकाणातून नारूचा तंतू बाहेर येणें मुष्कीलीचे असते. अशावेळी नवसागराशी नव्य सूतशेखर दिल्यानें नारू आंतल्या आंत जळून जातो.

## पार्श्वशूळ–

पार्श्वशूळ या शब्दांत पार्श्व हा जो शब्द आहे तो उदर पार्श्व आणि वक्ष पार्श्व अशा दोन्ही स्थानासंबंधी वापरला जातो. उदरगत पार्श्वशूळ हा कुक्षिशूळ म्हणजे कुशीत दुखणे, कूस–पोटाची कूस वेदनांकित होणे या अर्थानें घ्यावा. ही विकृति किंवा विकार बहुधा आमाशया (जठरा) चे व आंत्राचे भागात म्हणजे वाम पार्श्वात (डावे कुशीमध्यें) होत असल्यामुळे हा शूळ बहुत करून जडान्न खावून व तीक्ष्णोष्ण मद्यादि पेयपानामुळे तें खाल्ले प्यालेले स्तंभित होऊन अवरुद्ध वातगतीमुळे उत्पन्न झालेला असतो. त्यावर प्रथम वामक औषधानें उलटी करवून कोठा मोकळा करावा आणि मग नव्य सूतशेखर १ गुंज + विश्वाग्निगुडा २ गुंजा एकत्रून पाण्यासह द्यावे. बरे वाटते.

वक्षगत पार्श्वशूळ हा फुप्फुसावरण प्रदाहामुळे तेथे शोथ येऊन शुष्कता आलेली असते; त्यामुळे श्वास प्रश्वास घेतांना तीव्र वेदना असतात. विकार क्षेत्रानुसार वामपार्श्वभागी किंवा सव्य पार्श्वभागी अथवा दोन्हीही पार्श्वांमध्यें तीव्र शूळ असतो. यावर नव्य

सूतशेखर ३ गुंजा + रिंगणीचा घन ३ गुंजा + शृंगभस्म ६ गुंजा + कोहाळ्याचे सालीचें चूर्ण ६ गुंजा यांच्या तीन पुड्या करून एकेक पुडी मधावरोबर चाटण्यास द्यावी. दिवसांतून ३ वेळ याप्रमाणें दिल्याने शूळ कमी होतो. किंवा मुद्रिकेच्या पानांची लुगदी सुमारे बोराचे आठोळी एवढी घेऊन तीत १ गुंज नव्य सूतशेखर मिळवून मधासह चाटून खाण्यास द्यावी. याप्रमाणे दिवसातून ३ वेळ दिल्यानेंही हा पार्श्वशूळ तीन दिवसानी थांबतो; पण हें औषध मात्र ७ दिवस द्यावे. आणखी एक पार्श्वशूळघ्न मिश्रण– नव्य सूतशेखर ३ गुंजा + गोदंतीभस्म ३ गुंजा + उपलेट ६ गुंजा + अर्जुनसालीचे चूर्ण किंवा घन ६ गुंजा + श्रृंगभस्म ३ गुंजा + पुनर्नवामूळ चूर्ण ६ गुंजा + लक्ष्मीविलास ३ गुंजा एकूण ३० गुंजा होतात. त्यांच्या ३ पुड्या केल्यास एकेक पुडी १० गुंजांची होते. दररोज ३ वेळ एकेक पुडी दशमूळारिष्ट वरोवर किंवा पाण्यासह द्यावी. एक दोन सप्तकांत वरे वाटते.

## पांडुरोग नाशक कार्य–

घातक पांडुरोगामध्ये (Pernishous Aneamia) नव्य सूतशेखर १ गुंज + रत्नगिरी रस $\frac{1}{4}$ गुंज ते १ गुंज बल काल पाहून एकत्रून आलेरस मधासह किंवा दूध साखरेसह अथवा तूप साखरेतून नाहीतर दूधाचे सायीसह दिवसातून २ अगर ३ वेळ द्यावा. रत्नगिरी नसेल तर लोहसव्वीर किंवा अयवीर सिन्दूर त्याचे ऐवजी योजावा.

पांडुरोगावर नव्य सूतशेखर ३ गुंजा + मंडूरभस्म ३ गुंजा + प्रवाळपिष्ठी ६ गुंजा = ३ पुड्या दिवसांतून ३ वेळ देवद्रोणोचे रसासह अथवा पाण्यासह द्याव्यात. किंवा नव्य सूतशेखर ३ गुंजा

+ लक्ष्मी विलास ३ गुंजा एकत्रून आलेरस मध अगर खडीसाखरे-सह तीन पुड्या करून तीन वेळ याप्रमाणें तीन ते सात आठवडे द्यावे; अथवा केवळ नव्य सूतशेखर ३ गुंजा + अजमोदाचूर्ण ६ गुंजा = ३ पुड्या. दिवसांतून ३ वेळ पानाच्या ओव्याच्या रसासह (१ ते २ चमचे रसासह) द्यावा. याप्रमाणे ३ ते ७ आठवडे दिल्याने पांडुरोग जातो. केवळ ग्लूको साखरेसह किंवा खडीसाख-रेसह नव्य सूतशेखर दिल्याने ५–७ आठवड्यांत पांडुरोगाचा फडशा पडतो. रक्तवर्धन होते. पांडुरोग जाऊन रक्त वाढ व्हावी म्हणून नव्य सूतशेखर डाळिंबबीज रसासह द्यावा. किंवा कासीस-भस्म १ गुंज + नव्य सूतशेखर २ गुंजा + प्रवाळपिष्ठी १२ गुंजा + श्रृंगभस्म ६ गुंजा = २१ पुड्या करून रोज ३ वेळ याप्रमाणें सात दिवस दूध + तूप + साखरेसह दिल्याने रक्त कण भरपूर वाढून चेहरा टवटवींत दिसू लागतो. कासीसभस्माचे ऐवजी मंडूर भस्म किंवा रत्नगिरी रस अथवा अयवीर सिंदूरही या मिश्रणांत वापरल्यास चालते.

नव्य सूतशेखरांतील लोहवैक्रान्त भस्म, ताप्यहत ताम्र, चातुर्जात, उंटकटारी यासारख्या रक्तकण वाढवणाऱ्या द्रव्यामुळें केवळ एकटा नव्य सूतशेखर रस दुधाबरोबर अथवा पाण्याबरोबर देऊनही कार्य दिसतें; मग वरील सहकारी योगावरोबर दिल्यास जास्तच उत्तम व उत्कृष्ट कार्य दिसेल यांत नवल नाही.

## रक्तस्तंभनार्थ नव्य सूतशेखर–

रक्त वाढीबरोबरच नव्य सूतशेखराचे रक्तस्तंभक कार्यही नजरेस येते. हा त्याचा गुण त्याचे योगवाही धर्मामुळे घडतो. कसा तो पहा– रक्तस्तंभनार्थ नव्य सूतशेखर ३ गुंजा + प्रवाळपिष्ठी

३ गुंजा + धातकी फुलाचें चूर्ण ६ गुंजा = ३ पुड्या. एकेक पुडी दिवसांतून ३ वेळ पानफुटीच्या (पर्णबीज) पानांच्या २ ते ३ लहान चमचे भरून रसांत साखर मिळवून त्यासह दिल्यानें तीनच दिवसांत कोठूनही होणारा रक्तस्त्राव थांवतो. उदाहरणार्थ जठरांतून मुखा-वाटें होणारा, गुदमार्गावाटे होणारा, मूत्रासह होणारा, रक्तप्रदरादि कारणानी होणारा किंवा स्त्रीजननेंद्रिय विकाराचे अनुषंगानें होणारा कसाही रक्तस्त्राव या योगसमूहाचे योजनेनें थांवतो.

## कावीळ -

कावीळीवर नव्य सूतशेखर १ गुंज हिंगणाच्या पानांचे १ चमचा रसासह अथवा त्यांचे चूर्णासह नाहीतर हिंगणाच्या पानांचे ४ गुंजा धनासह द्यावा. सकाळ संध्याकाळ २ वेळ याप्रमाणें दिल्यानें ७ दिवसांत कावीळ नष्ट होते. कामोणीचे पानांचे चमचाभर रसा-सह अथवा पांढऱ्या वसूचे पानांच्या रसासह दिल्याने ही कावीळ तीन दिवसांत नाहीशी होते. दूधगौरीचे (दुधीकुडा किंवा गोडा इंद्रजव) सालींचे चूर्ण ४ ते ८ गुंजा किंवा तिचें बीज म्हणजेच गोडचवीचा इंद्रजव भाजून त्याचें चूर्ण ४ ते ८ गुंजा आणि नव्य सूतशेखर १ गुंज एकत्रून दिवसांतून ३ वेळ पाण्यासह दिल्यानेंही कावीळ नष्ट होते. कावीळीत मलावरोध असेल तर दूधगौरीच्या सालीचें चूर्णा-बरोबर अथवा गोडचा इंद्रजवाबरोबर बाळ हिरड्यासारखे किंवा कुटकी अथवा निशोत्तरासारखें सारक औषध शक्ती पाहून ४ ते ८ गुंजापर्यंत योजून त्यासह नव्य सूतशेखर देत जावा. पुढील मिश्रण तर कावीळीवर केवळ अप्रतिम ठरले आहे. पूनर्नवा मूळ चूर्ण २ गुंजा + अनंतमूळ चूर्ण २ गुंजा + सुंठ २ गुंजा + यवक्षार १ गुंज + नव्य सूतशेखर १ गुंज + माक्याचे चूर्ण २ गुंजा = १ पुडी याप्रमाणें दिवसांतून ३ वेळ याप्रमाणें २ ते ७ दिवस द्यावें. कसलीही आणि

कितीही जुनाट असलेली कामीण नष्ट होते. कावीळीचे रोग्यास जर शौचाला पातळ होत असेल, तर या मिश्रणांत दूधगौरीची साल अगर गोडा इंद्रजव २ गुंजा मिसळावे. मलावरोध असेल तर वर लिहिल्याप्रमाणें एखादे सारक औषध किंवा सोनामुखीच्या पानांचे किंचित भाजून केलेले चूर्ण २ गुंजा घालावे. मूत्र अल्प येत असेल तर यांतच प्रत्येकी अर्धा गुंज सोरमीठ व नवसागरही मिळवून द्यावे. फार लौकर गुण दिसतो. कावीळीच्या रोग्यांच्या डोळ्यांतील पिवळेपणा लागलीच नष्ट होण्याकरितां उंबराची साल पाण्यासह उगाळून निघालेला गंध काजळ घातल्याप्रमाणें डोळ्यात घालावा. किंवा गव्हाचे तेल काजळ घातल्याप्रमाणें डोळ्यात घालावे. थोडी आग होते, पण नंतर डोळ्याला एकदम थंडावा येतो व पिवळी झांक नष्ट होते.

पांडुरोगाचे आणि कावीळीचे औषध चालू असतांना रोग शरीरातून नष्ट होत आहे किंवा नाही हे पाहाण्याकरितां सकाळीं रोग्यास गोडे तेलाचा तोंडात गुळणा धरून तो तोंडात इकडेतिकडे घुसळण्यास सांगावे. ५-७ वेळ याप्रमाणें तोंडातले तोंडात तो गुळणा फिरवून थुंकून टाकण्यास सांगावा. याप्रमाणें ७ गुळण्या रोज असे ३ ते ७ दिवस करण्यास सांगावे. पहिले दिवशीं थुंकलेला गुळणा कोंबडीचे पिवळे बिलाप्रमाणें रंगाचा व लाळयुक्त आढळतो. तिसरे किंवा सातवे दिवशीचा गुळणा तेलासारखा शुद्ध आढळतो. याचा अर्थ रोग गेला असे खात्रीने जाणावे.

**राजयक्ष्मानाशक प्रभाव–**

राजयक्ष्मा-क्षयामध्ये नव्य सूतशेखर खर्जूरादि चूर्णाबरोबर दिवसांतून २ वेळ देऊन जेवणानंतर द्राक्षासव + अश्वगंधारिष्ट + दशमूलारिष्ट + अमृतारिष्ट + पिप्पल्यासव एकत्र करून २ ते ४ लहान चमचे दुप्पट पाण्यासह द्यावे. किंवा–

नव्य सूतशेखर ३ गुंजा
विमल मालती वसंत ३ गुंजा
लक्ष्मीविलास ३ गुंजा
दिव्य कामदुधा ६ गुंजा
सितोपलादिचूर्ण १२ गुंजा

एकेक पुडी तेवढ्याच ग्लूको साखरेसह चाखत माखत खावून वरून मज्जाघृत १ चमचा + मध २ चमचे किंवा साखर २ चमचे मिळवून चाटून खावे याप्रमाणें

= ३ पुड्या दिवसांतून ३ वेळ आणि तीन महिने द्यावे. या मिश्रणाने रोग जाऊन उत्तम शक्ति येते. या मिश्रणांत श्रृंगभस्म ३ गुंजा ते ६ गुंजा आणि गुळवेलसत्व ६ गुंजा मिसळले तरी चालते.

अगर वाकीची कोणतीच औषधें उपलब्ध नसल्यास केवळ नव्य सूतशेखर १ ते २ गुंजा शेळीचे अगर कोणतेही कोमट दुधासह दिवसांतून ३ वेळ द्यावा, आणि जेवणाच्या वेळीं दोन औंस मृतसंजीवनी सुरा दुप्पट पाण्याशी अगोदर प्यावी आणि बेताने घातलेल्या काळ्या मसाल्याचे चटणीने युक्त किंवा तांबडे तिखट उंची शाजिरे, दालचिनी आदि मसाला घालून तयार केलेले बकऱ्याच्या मांसाचे आमिषान्न, गव्हाची पोळी (चपाती) भातासह किंवा ज्वारीचे भाकरीसह भोजन घ्यावे. महिना दीड महिना याप्रमाणें आहार व औषध घेतल्यावर आंगांत चांगली शक्ति वाढून कास, श्वास, अंसदाहादि लक्षणे कमी झाली असे पाहून दररोज सकाळीं २ ते ४ ग्लास नीरा प्यावी. नव्य सूतशेखर चालूच ठेवावा. याप्रमाणें तीन महिने उपक्रम ठेवल्यानें राजयक्ष्मा निश्चयाने नाहींसा होतो.

## कास श्वासघ्न कार्य–

कास म्हणजे खोकला आणि श्वास म्हणजे दमधाप लागते त्याचे नाशनार्थ नव्य सूतशेखर १ गुंज + मध २ चमचे + रिंग-

णीचा काढा. दोन ते चार तोळे एकत्रून सकाळीं आणि रात्रीं झोपते वेळी द्यावे; नाहींतर नव्य सूतशेखर १ गुंज + रिंगणीचा घन २ गुंजा = १ पुडी याप्रमाणें दिवसांतून ४ पुड्या मधाबरोबर अगर साखरेच्या पाकाबरोबर अथवा पाण्याबरोबर द्याव्यात; तीन ते सात दिवसांत गुण येतो. खोकला दम्म्यानें बेजारून रोडावलेल्या रोग्यास नव्य सूतशेखर १ गुंज + कासक्लेशघ्न चूर्ण ४ ते ८ गुंजा वासावलेहासह दिवसांतून ४ वेळ याप्रमाणें एक दोन आठवडे द्यावा. चिंतामणी चूर्ण किंवा अष्टांगचूर्णासह नव्य सूतशेखर दिल्यानेही कासश्वासाचा नायनाट होऊन मोठा घोर मिटतो; किंवा अष्टांग हृदय उत्तरस्थान अध्याय ३९ श्लोक १६१ मध्ये सांगितलेला व बृहत्संहितेत वराहमिहिरानें वाखाणलेला शशांक योग २ गुंजा + नव्य सूतशेखर १ गुंज एकत्रून नियमितपणे मधाशी किंवा आलेरस खडीसाखरेशी श्वासाचे रोग्याला सकाळी रिकामे पोटीं, असेच दुपारी व रात्री झोपते वेळींही द्यावें, म्हणजे घशांत सुंई सुंई वाजणें- घुर्घुरी बंद होऊन छान झोप येते. सकाळी झटपट बेडके पडून जातात आणि हळूहळू धाप-दम लागणें बंद होऊन श्वासाचे गावर्त (दम्याचा अटक) येणें बंद होते, आणि दम्मेकरी रोडका असलेला चांगलेच अंग धरतो. आलेरस वेळेवर नसेल तर सुंठ साखरेबरोबर द्यावे; नाहीतर गरम गरम दुधाबरोबर दिल्यासही चालते. श्वासावर नव्य सूतशेखर सोमयोगाबरोबर दिल्यानेही उत्तम उपयोग होतो. पडसे, खोकला, अंगदुखी याकरितां हा नव्य सूतशेखर मध पिंपळीशी दिवसांतून ४ वेळ द्यावा. यांतच मान, पाठ जखडणें व कसर असल्यास वेबा मिश्रणासह द्यावा. मोड्याताप (फ्लूचा ताप) मग तो हाँगकाँग फ्लू असला तरीही या योगाने नष्ट होतो. डांग्याखोकल्यावर नव्य सूतशेखर वयपरत्वे ½ ते १ गुंज बकुळ पाकाबरोबर दिवसांतून ६ वेळ द्यावा. एकाच सप्तकांत बरे

वाटते. घसा बसलेला असताही नव्य सूतशेखर बकुळ पाकासह किंवा मधासह वारंवार चाटण्यास द्यावा.

## उन्माद अपस्मार–

डोके फिरून वेड लागणें, बडबड, निद्रानाश व सतत कांहीना कांही धडपड ऊठ पळ करणारे उन्मादीं रोग्यास नव्य सूतशेखर १ गुंज + जांबवीचूर्ण ८ गुंजा = १ पुडी, याप्रमाणें दिवसांतून ३ वेळ पाण्यासह द्यावे. अपस्मारावर म्हणजे फेंपरे येणे यावरही हाच योग रोज ३ वेळ याप्रमाणें ३ ते ७ आठवडे अगर तेरा आठवडे द्यावा. फेंपरे जाते. जाम्बवी = सर्पगंधा पांढऱ्या फुलांची

## वातविकार–

वातक्षोभामुळे येणारे नानातऱ्हेचे आक्षेपकाचे शमन नव्य सूतशेखराने होते. अर्धांगवायूचे झटक्यावर वडाच्या कोमल पारंबीचे कोंवळे अंकूर स्त्री दुग्धांत किंवा गाढवीचे दुधांत नाहीतर मिळेल त्या दुधांत वाटून निघालेल्या रसांत नव्य सूतशेखर उगाळून निघालेला गंध मलमली फडक्यांत घेऊन नाकांत ४–६ थेंब प्रत्येक नाकपुडीत डोके लोंबते सोडून पिळावें. तीव्र वेगांत डोळ्यातही थेंब सोडावेत. मात्र नस्य प्रयोग वारंवार करू नयेत. लागोपाठ २–३ दिवस करावेत. पोटांत देण्याकरितां नव्य सूतशेखर १ गुंज + ½ गुंज महावात विध्वंस एकत्रून दिवसांतून ३ वेळ डेक्स्ट्रोज साखरे (रक्त शर्करा) बरोबर नाहीतर ग्लूको साखरेबरोबर अथवा दूध खडीसाखरेबरोबर द्यावें. पक्षाघात जीर्ण असल्यास नव्य सूतशेखर १ गुंज + कोंबडनखीचे चूर्ण ४ ते ८ गुंजा = १ पुडी याप्रमाणें दिवसातूत ३ वेळ पाण्याबरोबर अथवा दुधाबरोबर देत राहिल्यास

वधांगांत चलनवलन सुरू होते. सतत ७ ते १३ आठवडे दिल्याने उत्तम फरक झालेला दिसतो. चिरकारी (क्रानिक) रोग आटोक्यांत येतो.

पक्षाघात, बालपक्षाघात, लेखकांचा हस्तकम्प, कलायखंज, अवबाहुक (अंसशोष), विश्वाची गृध्रसी, धनुर्वात, कटिवात (Gerdle Pain), गुदमार्ग वायूचा स्तम्भ इत्यादि अनेक प्रकारच्या वातरोगांवर नव्य सूतशेखर सहाय्यक औषधासह योजावा. जसे-पक्षाघातावर वर लिहिलेच आहे. महावात विध्वंस उपलब्ध नसेल तर अभिनव वातविध्वंस १ गुंज योजावा किंवा पक्षाघातावर व बालपक्षाघातावर (Poliomyelitis) नव्य सूतशेखर ३ गुंजा + षट्चरण योग १२ गुंजा + समीर गजकेसरि ३ गुंजा एकत्र करून ३६ पुडया बांधाव्यात; म्हणजे एक पुडी ½ गुंजेची होते. लहान मुलाना रोज ३ वेळ एकेक पुडी मज्जाघृत ½ चमचा व मध १ चमचा मिळवून बारा दिवस दिल्यानंतर; या मिश्रणाच्या अठरा पुडया बांधाव्यात. म्हणजे एकेक पुडी एकेक गुंजेची होते. रोज ३ वेळ वरील प्रमाणेंच दिल्यास मिश्रण सहा दिवस पुरते, नंतर हे मिश्रण वरील प्रमाणानेच घेऊन त्याच्या नऊ पुडया बांधाव्यात; म्हणजे एका पुडीत मिश्रण २ गुंजा येते. दिवसांतून तीन वेळ एकेक पुडी याप्रमाणें तीन दिवस देऊन झाल्यावर उतरत्या क्रमाने औषध देणें सुरू करावे; म्हणजे सहा दिवसांच्या १८ पुडया, बारा दिवसाच्या ३६ पुडया याप्रमाणें प्रमाण कमी करीत जावें. या वर्धमान व क्षीयमान क्रमाने औषध दिल्यानें हे वातरोग निश्चयाने नाहीसे होतात. मात्र दर आठवडयास एक दिवस बस्ति देण्याचा उपक्रम अवश्य ठेवावा. तसेंच दर आठवडयास एकवेळ पारव्याचे रक्त पक्षवधांगाला चोळण्याचा उपक्रमही करावाच. मोठया वयाच्या

माणसांना शक्ती–बलाबलाप्रमाणें वरील मिश्रणाचें प्रमाण वाढवून द्यावे. लहान वा मोठ्या वयाच्या रुग्णाला चहाप्रमाणेंच तयार करून घ्यावयाचे बलोत्साही पेय दिवसांतून ३–४ वेळ द्यावें.

धनुर्वातावर– नव्य सूतशेखर ३ गुंजा + नागरसायन ९ गुंजा एकत्र करून मध ½ तोळा व तूप ¼ तोळा मिळवून चाटण तयार करावें आणि हे चाटण वरचेवर चाटवावे. दंतबंध असल्यास दांतास लावावें. चोळावे कोणीकडून जिभेखाली मिश्रण जाऊन शोषित होईल किंवा घशाखाली उतरेल असें करावें, म्हणजे हळू-हळू उपशम होत जातो. धनुर्वाताचे आक्षेप क्रमानें कमी होत जातात. या मिश्रणाचें नस्य केलें तरी चालेल, किंवा पिंपळाच्या पारंबीचा अगर त्याच्या मुळीच्या सालीचा वाटून पिळून रस काढावा. या रसांत नव्य सूतशेखर ¼ गुंज मिळवून ब्रह्मरंध्रावर काकपद (इंग्रजी V व्ही सारखी किंचित रक्त येईल अशी तीक्ष्ण शस्त्राने लहानशी चिरणी) घालून तेथे तो रस बोटाने चोळावा. या उपयोगानेही धनुर्वाताचे रोग्याला उतार पडतो. ब्रह्मरंध्रावर नव्य सूतशेखर ½ गुंज + गोधावसा २ थेंब तिथे काकपद घालून जिरवल्यास धनुर्वातावर उतार पडतो. तसेंच कानामागील हाडाच्या टोकाखालच्या भागावरही हे मिश्रण चोळून चोळून जिरवावें. या उपायानेही धनुर्वाताचे झटके विराम पावत जातात. दंतबंध व ग्रसणी ढिली पडते. लसणीचे रसांत नव्य सूतशेखर ४ गुंजा मिळ-वून पायाचे व हाताचे तळव्यास चोळून चोळून जिरवावे म्हणजे कांही वेळानें घशांत लसणीचा वास तरळू लागतो, आणि धनुर्वाताच्या रोगाची पीछेहाट सुरू होते. नव्य सूतशेखर ½ गुंज ते १ गुंज प्रमाणाने घेऊन त्यांत माक्याचा रस आणि अळूच्या गड्ड्यांचा रस (अळूचे गड्डे म्हणजे श्यामकुरा किंवा चामाकुरा अथवा चिमखोरा

या नांवाने मंडईत मिळणारे भाजीचे कंद) एकत्र करून तूप घालून किंचित कोमट करून नाकांत थेंब सोडावेत. नाकातून घशांत औषध उतरले तरी कांहीं बिघडत नाहीं. धनुर्वाताचे झटके कमी वेळा येऊ लागतात. दंतबंध ढीला पडतो. तेव्हां हे मिश्रण तोंडावाटे द्यावें. या प्रमाणांत (म्हणजे नव्य सूतशेखर १ गुंज + माकारस १ चमचा + चिमखोरा रस १ चमचा + तूप १ चमचा एकत्र करून कोमट केलेले मिश्रण) घेऊन दरखेपेस द्यावें. असें दिवसांतून ४-६ वेळां दिल्यानें रोगाचे बळ मोडून तीन ते सात दिवसांत रोग हटतो.

लेखकाचे हस्त कंप रोगांत आलेरसासह नव्य सूतशेखर सुमारे १ ते २ गुंजा मिळवून एकजीव करून हाताचे तळव्याला सारवावा; आणि मधाचा अस्सल मेणाचा गोळा त्या हातांत धरून त्यावर हळूहळू हाताच्या बोटानी सर्व बाजूनी दाब घालीत जावें. सैल सोडावे. पुनः पुनः दाब घालीत जावें. याप्रमाणें पांच दहा मिनिटे रोज सराव करीत जावें. या प्रयोगाने नव्य सूतशेखर तळहाताच्या कातडीतून शिरून हळूहळू १ ते २ आठवड्यांत हाताचा कम्प जातो व लिहितांना हात कांपत नाही. दाब घालून झाल्यावर घोरपडीची चरबी लावून हातांना मालिश करावे, म्हणजे गुण आलेला कायम टिकून राहातो. पोटात घेण्यास नव्य सूतशेखर १ गुंज + **गतिरोधहर मिश्रण** ४ गुंजा = १ पुडी याप्रमाणें दिवसांतून तीन वेळ पाण्याबरोबर, दुधाबरोबर अगर चहा कॉफी बरोबर घेण्यास द्यावे. एक दोन आठवडे दिल्यानंतर यांतच १ गुंज रससिंदूर मिसळून आणखी एक दोन आठवडे द्यावे, म्हणजेही विकृति तर जातेच पण त्या हातालाच नव्हे तर सर्व स्नायु त्यांतून रक्त प्रवाह जोरदार खेळू लागल्यामुळे सर्वच गति कंडरानाही केंद्राना जोम येतो.

अवबाहुक- विश्वाची, ग्रध्रसी, कटिवात, कलायखंज आदि वात रोगावर नव्य सूतशेखर १ गुंज + षड्धरणचूर्ण ६ गुंजा + सूक्ष्म समीर सिंदूर अथवा सूक्ष्म समीर पन्नग १ गुंज = १ पुडी याप्रमाणें दिवसांतून ३ वेळ ३ पुड्या तूपसाखरेसह किंवा आलेरस मधासह अथवा लघुराजमृगांकानुपानासह द्याव्यात. ३ ते ७ आठवड्यांत गुण येतो.

गृध्रसीवर नव्य सूतशेखर १ गुंज + प्राजक्तवटी १ गुंज एकत्रून एक पुडी सकाळी देऊन वरून पारिजातक पानांचा काढा प्यावयास द्यावा. दुपारी व रात्री केवळ नव्य सूतशेखर + प्राजक्त-वटी १।१ गुंज पाण्यावरोबर द्यावी. एक सप्तकात गुण दिसतो. गृध्रसीवेदना तीव्र असतील तेव्हां नव्य सूतशेखर वेदनाशामक मिश्रणासह द्यावा.

गुदमार्गाच्या स्नायूंचा स्तंभ होऊन मलनिस्सरण होत नाहीं. हाताच्या बोटानी मल काढावा लागतो. गुदमार्गातील मलोत्सर्जी स्नायू स्तब्ध राहतात. गुदमुखाजवळ आलेला मळ तसाच सांचून राहातो. मग तो हाताच्या बोटानी निकाली काढावा लागतो. अशी ही अवस्था विशेषतः दुपारून वा सायंकाळच्या, रात्रीच्या वेळी मल-प्रवृत्ति होते तेव्हांच असते. पहांटे वा सकाळचे मलविसर्जनाच्या वेळी नसते. याबरोबरच कांही कांहीना हातापायांत किंवा विशेषतः पायांत चालता चालता मुंग्या भरतात, म्हणजे पायांत रक्तप्रवाह खेळणें न्यून होऊन पायाना जडपणा येतो व त्यांतील अवसान जाऊन भेंडाळल्याप्रमाणें होते. चालणें अशक्य होते. थोडा वेळ बसून राहिल्यावर पुनः रक्त प्रवाह चालू होऊन अर्धा एक फर्लांग चालता येते. पुनः मुंग्या खेळू लागतात आणि पायातील अवसान जाते. वर लिहिलेला गुदमार्ग स्नायू स्तंभ व हा पायांच्या संधिस्नायूंचा गतिरोध,

ढीलेपणा व रक्तप्रवाह स्तब्ध होणें हे लक्षणही सकाळच्या वेळी चालता फिरतांना नसतें. पण दुपारून, सायंकाळी वा रात्रीच असते. यावरून हा विकार पित्त आणि वात दोष दृष्टीमुळें उद्भ-वलेला आहे हे सिद्ध होते. यावर प्रथम मल निस्सरण व्यवस्थित सुरू होण्यास नव्य सूतशेखर १ गुंज + वाजिवर्मा रस १ गुंज + काळया मनुका ४ गुंजा + वेलची बीज चूर्ण ¼ गुंज एकत्र करून द्यावें. वर दोन घोट थंड पाणी प्यावयास द्यावे. याप्रमाणें सकाळी अगर रात्रीं झोंपतेवेळी घेत गेल्यानें ३ ते ७ दिवसांत फरक पडतो. बलाबल पाहून हें मिश्रण कमी जास्त करावे. हे औषध चालू आहे तोंवर मूगदाळीच्या व तांदुळाच्या मिश्रणाची खिचडी तूप घालून द्यावी मलनिस्सरण नैसर्गिक विना कष्ट होऊ लागते व पायाच्या संधिस्ना-यूंचा ढिलेपणा, रक्त प्रवाह स्तब्ध होणें यांतही सुधारणा होते. हे मिश्रण देऊनही विशेष फरक दिसेना तर ते बंद करून नव्य सूतशेखर ३ गुंजा + पवनाशन ३ गुंजा एकत्रून तीन पुड्या करून, एकेक तूप साखरेबरोबर किंवा सायसाखरेबरोबर नाहीतर आलेरसांत उमाठीचं (लोहलक्कड–चोबेहयात) लाकूड उगाळून निघालेल्या चमचाभर गंधात खडीसाखर मिळवून चाखतमाखत खावयास दिवसांतून ३ वेळ द्यावे; अथवा अहिवंगभस्म भ्रंडज + नव्य सूतशेखर १ गुंज एकत्रून लोणी अगर दुधाच्या सायीसह खाण्यास द्यावें. सकाळी एक वेळच असे दिल्यानें दोन तीन सप्तकातच गुण दिसतो. मग बाकी-चीही सहकारी औषधे काढून टाकून केवळ नव्य सूतशेखर तेवढा दुधा–तुपा–सायीसह वा लोण्यासह किंवा आलेरस खडीसाखरेसह ३ महिने सतत २ वेळ, रोज याप्रमाणें दिल्यानेही दृढ मूस झालेली खिळलेली व्याधी नष्ट होते व स्मरणशक्तीही वाढते. हा विकार उतरत्या वयाच्या माणसांमध्येच झालेला आढळतो.

## गुल्मरोग व नव्य सूतशेखर–

गुल्म रोगांत अपान वायूची दुष्टी व मलबंध तीव्र असतो. त्यामुळे विष्ठेंचे कठीण खडे बनणें आणि कष्टाने मलविसर्जन तेंही उशिरा म्हणजे कांहींना दोन चार दिवसानी एकदां होण्याची संवय जडलेली असते. मूत्रोत्सर्जनही त्रासाने होते. कोरड्या ढेंकरा किंवा ढेकरा न आल्यास पोटास तडस व पिंडिकोद्वेष्टन (पायाच्या पिंढऱ्याना पेटके येणें आदि) लक्षणे दिसतात. यावर नव्य सूतशेखर २ गुंजा धात्रीघृतासह दिल्याने आणि जेवणामध्ये भाकरीवर किंवा पोळीवर हेंच धात्रीघृत माखून दुधाबरोबर अगर सारक भाज्याबरोबर खाण्यास द्यावें म्हणजे गुल्माची गाठ (फुगा) विघरते.

पित्तज गुल्मावर प्रथम विरेचन देऊन मग नव्य सूतशेखर २ गुंजा + हिंग्वादि एकोत्तर वृद्धिचूर्ण ४ गुंजा मिळवून पाण्यावरोबर १ पुडी सकाळी तशीच दुपारी व रात्रीही द्यावी; किंवा नव्य सूतशेखर १ गुंज + प्रवाळपंचामृत १ गुंज = १ पुडी दुधावरोबर द्यावी. याप्रमाणे दुपारी व रात्रीही द्यावी. कफगुल्मावर नव्य सूतशेखर २ गुंजा + विश्वाग्नि गुडा ४ गुंजा एकत्रून १ पुडी सकाळी द्यावी; तशीच दुपारी व रात्रीही पाण्यावरोवर द्यावी.

रक्तगुल्म स्त्रियांना होतो. त्यांचा तो गोळा गर्भ नव्हे अशी खात्री झाल्यावर हा नव्य सूतशेखर २ गुंजा + वन्हिमुख योग ६ गुंजा + टरपेंटाईन तेल २ थेंब एकत्र करून ती पुढी पाण्यावरोबर द्यावी. याप्रमाणे सकाळीं दिल्यावर पुन: देऊ नये. असें रोज सकाळी एकेक द्यावी. याप्रमाणे ३ दिवस दिल्यावर रक्तस्त्राव सुरू होतो. गुल्माचा निचरा होतो. सूचना– नवख्या चिकित्सकानें हे उपचार तज्ज्ञांचे देखरेखी खालीं करावेत. कारण पुढे रक्तस्त्राव सुरू झालेला बंद होतेंवेळी किंवा स्त्राव थांबते वेळी कांहीं घोटाळे झाल्यास

रोगिणीस आक्षेपक ( झटके ) सुरू होतात. यासाठी अशा रुग्णेस रुग्णालयातच दाखल करून चिकित्सा द्यावी; म्हणजे सुश्रुषा व स्वच्छता चांगली राखली जाऊन उपद्रव होत नाहीत, झाल्यास तात्काळ उपाय योजानाही करता येते.

द्वंद्वज सान्निपातिक गुल्मावर तारतम्यानें या स्तंभांत सांगितलेली सहकारी औषधें, अनुपानें व पथ्यादि योजावेत. तसेच प्रचलित वज्रक्षार, शंखवटी, भास्करलवण, हिंग्वष्टक, शंखद्राव, चिंचातैल किंवा चिंचाघृत, कांकायन गुटिका, योगराजादि गुग्गुळ-कल्प, चंद्रप्रभावटी, त्रियोनिरस ( रसराज लक्ष्मीग्रंथांचे मुकुन्दी टीकेत लिहिलेला पाठ), द्राक्षासव, खर्जुरासव, कुमारी आसव, चविकास-वादि सहकारी योग व अनुपाने योजावीत.

## हृदयविकारांत नव्य सूतशेखराचें कार्य–

हृद्रोगान्तर्गत अनेक लक्षणात्मक जे अवस्थाभेद दिसतात त्यामध्ये कारणानुरूप चिकित्सा करितांना या नव्य सूतशेखराचा अनेक दृष्टीनी महत्वपूर्ण उपयोग करून घेता येतो. जसे हृदयावरण शोथ (Peri carditis) विकारांत प्रभाकरवटीचे चूर्ण २ गुंजा, नव्य सूतशेखर २ गुंजा एकत्र करून ती पुडी अर्जुनारिष्टाशी द्यावी. याप्रमाणें दिवसांतून ३–४ वेळ द्यावे. अर्जुनारिष्ट प्रमाण ½ तोळा + १ तोळा पाणी.

आमवातज हृद्रोगांत (Rheumatic endo carditis) अभिनव वात विध्वंस १ गुंज + नव्य सूतशेखर १ गुंज यांची पुडी महारास्नादिक्वाथ ½ तोळा व पाणी १ तोळा एकत्रून द्यावे. याप्रमाणें दिवसांतून ४ वेळ द्यावे किंवा केवळ पुडचा दिवसांतून ४ वेळ पाण्याबरोबर देऊन जेवणानंतर क्वाथ योजावा.

हृच्छूल (Anjina Pectoris) विकारांत नव्य सूतशेखर शृंगभस्माबरोबर देऊन दशमूलारिष्ट जेवणानंतर योजावे. निदानांतील वातज हृद्रोगाची लक्षणे या हृच्छूलाशी जमतात. या हृच्छूलाचे सर्व साधारणतः चार भेद आढळतात.

१) श्रमजनित हृच्छूल (Anjina of effort) अतिशय जिवापाड श्रम केल्यानें उदाहरणार्थ बांधकामातील वारंवार शिड्या चढून ने आण करून उरी फुटणारे कामगार, रिक्षा ओढणारे, ढकलगाडी हाताने व खांद्याचा आधार देऊन ओढणारे इत्यादींना होतो. जेवण घेतल्यानंतर लागलीच कष्टप्रद कामाना आरंभणाऱ्या व्यक्तीना किंवा जेवल्या जेवल्या धावत पळत काळजीनें धडपडत कामावर जाण्याची ओढघस्त करणाऱ्याना हा हृच्छूल होतो. अशाना कांही काळ विश्रांति देऊन हलका आहार व जेवणानंतर थोडावेळ वामकुक्षी करण्यास सांगावें. भोजनानंतर पाणी न पिता तासाभराने पिण्यास सांगावें. जडान्न वर्ज्य करावे. पोटात वातगुबारा न धरेल असेंच खाणे द्यावे. या श्रमजनित हृदयशूळावर २ गुंजा नव्य सूतशेखर + १ गुंज सूक्ष्मकृत मल्लभस्म मधात कालवून एकेक बोट दर पांच मिनिटास जिभेवर चाटवावे. याप्रमाणें चाटवल्यानें तासा अर्ध्यातासातच वेदना कमी होतात. श्वास मोठ्या कष्टाने घ्यावा लागत होता तो मोकळेपणी घेता येऊ लागतो. बाहूकडे विशेषतः डाव्या बाहूकडे फैलावत जाणाऱ्या वेदना नष्ट होतात. अशाप्रकारे रोगवेग थांबल्यावर मग केवळ नव्य सूतशेखर १ गुंज + शृंगभस्म २ गुंजा यांची एक पुडी सकाळी तेवढीच संध्याकाळी द्यावी. जेवणानंतर दशमूलारिष्ट ½ ते १ तोळा दुप्पट पाण्याबरोबर द्यावे. एक दोन सप्तकातच बरे वाटते. तात्कालिक वेदनाहर औषध म्हणून योजिलेले सूक्ष्मकृत मल्लभस्म वेदना थांबताच बंद करावे.

२) हृदयाच्या महाधमनीचे आकुंचनजन्य प्रकारांत (Spasmodic Anjina) वर लिहिलेले श्रमजनित हृच्छूलाप्रमाणें हा प्रकार जेवणानंतरच सुरू होतो असेंच कांही म्हणतां येत नाही. पण हा हृदय रोग थंडी बाधल्यामुळे फिरंगरोगजन्य महाधमनीची विकृति होऊन (Aortic Syphilis), क्रोधावेशामुळें, मधुमेहातील स्त्रोतोरोधामुळें ( Diabetic Atherosclerosis ) धमनी अकालवृद्ध (अकाली म्हातान्या होणें) त्याच प्रमाणें मधुमेहाच्याच योगानें स्त्रोतोरोधामुळे सूक्ष्म हृदयधमनीना तारेसारखा ताठ कठोरपणा येऊन (Arterio Sclerosis) हृदयाची मेदापक्रांति (Fatty-Degeneration ) होऊन, मोडच्यातापामुळें (फ्लू ज्वर), वातरक्त (गाऊट) विकारामुळें जडतो. तेव्हा त्या त्या विकाराची चिकित्सा चालू असतांना किंवा आकस्मिकपणेही हा शूल उद्भवला असतां; नव्य सूतशेखर २ गुंजा + सूक्ष्मकृत तालकभस्म एक गुंज एकत्रून मधासह वारंवार चाटण रूपानें देऊन हे जिवावर बेतलेले संकट- ही आणीबाणीची वेळ टाळतां येते. या मिश्रणाचे चाटण दिल्याने हळूहळू हृदयाच्या निघत असलेल्या तीव्र वेदना एकसारख्या खाली आणि डावीकडे-डावे भुजेकडे पसरत जात असलेल्या कमी कमी होत जातात. चेहरा प्रेतवत झालेला, फिकट पिवळट झालेला पुन: पूर्ववत, पूर्व स्थितीला येऊन आरक्त दिसू लागतो. सर्वांगाला गार घाम सुटलेला थांबतो. रोग्याला आपण जरा हललो कीं हृदयवेदना तीव्र स्वरूपानें येऊन आता आपला प्राणान्त होतो की काय असे जे वाटत असतें तेंही कमी पडून त्याला हायसें वाटते. रक्तदाब वाढलेला असतो तोही सम्यक् होतो. नाडीवेग वाढलेला आटोक्यांत येऊन ती नेहमीप्रमाणे स्थिर चालू लागते. कांहीना तर कपडच्यातच लघवीला होते, झटका येतो, उलटी होते. एवढे सगळे चालू असतांही रोगी पूर्णपणे शुद्धीवर असतो व या सगळ्या

तीव्रावस्था अनुभवीत असतो. हा हृदयशूळ विकारग्रस्त रोगी पन्नाशी ओलांडलेला, बहुधा सुखवस्तु पुरुष व बुद्धिमान असतो.

३) हृदय धमनीचा अवरोध (Status Anjinasus किंवा Coronary Thrombosis अथवा Myocardial infarction) हृदयपोषक धमनीमध्ये रक्ताचा घनीभूत बिंदु अडकून हृदयपोषण बंद पडतें आणि छातीत तीव्र वेदना कळा सुरू होतात. रक्ताभिसरण ज्या समयी मंदगतीचे असते, त्या काळांत हा रोग जोर धरतो; उदाहरणार्थ--रात्री नाडी गती मंद चालते तेव्हांच याचे आवेग आलेले आढळतात. शीतकालातही हा रोग जोर करतो. जे लोक ऐष आरामी, सुखवस्तु, कष्टाची, अंगमेहनतीची कामे न करणारे हळव्या मनाचे आणि बैठी कामे करणारे असतात; जे वानस्पतिक तूप किंवा मार्गारीनसारखे प्राणिज चरबी आदीपासून तयार केलेले कृत्रिम तूप वापरून केलेलीं जडान्ने खाणारे, यांना हा विकार जडतो. जडलेला विकार धूम्रपानाने वाढतो. यावर धमनीमधून वाहणाऱ्या रक्ताचा अवरोध नष्ट करणाऱ्या योगाची चिकित्सा आवश्यक आहे. याकरितां नव्य सूतशेखर २ गुंजा, अहिफेनीय मल्लभस्म $\frac{1}{4}$ गुंज एकत्रून ६ पुड्या कराव्यात; आणि एकेक पुडी पांच पांच मिनिटाला मधासह चाटवावी, म्हणजे अवरोधी द्रव्याचे Thrombos चे विलयीभवन तर होतेच याशिवाय वेदनाशमन होऊन रोग्यास शांत झोप लागते. प्राणसंकट टळतें. तदनंतर नव्य सूतशेखरच केवळ दिवसांतून ४ वेळ प्रत्येकी एक गुंज आलेरस मधाबरोबर किंवा दुधाबरोबर सतत कांही दिवस देत राहावें आणि जेवणानंतर कस्तूरीयुक्त दशमूलारिष्ट दुप्पट पाण्याबरोबर द्यावे.

४) मनोविकारज हृच्छूल ( Pseudo Anjina किंवा Anjina innocans ) यालाच कोणी कोणी सुप्त किंवा फसवा

खोटा भ्रमजन्य हृदयशूळही म्हणतात. हा सौम्य हृदयविकार आहे. हा विकार कांही तरी अंगमेहनतीचे काम अगर व्यायाम केल्यानंतर दिसून येतो. छातीत वेदना होतात. बहुधा मूर्च्छा येते. पण हा तेवढा घातक नाहीं. कांहीतरी शारीरिक अन्यरोग कारण दाखवून, रोग्याचे मनावरील दडपण काढून टाकावे; व मन:शांती करितां अर्जुनत्वक् घन + खुरासानी ओवाचूर्ण + श्रृंगभस्म + अफू यांचे समान भाग मिश्रण १ गुंज व नव्य सूतशेखर १ गुंज एकत्र करून दूध अगर कॉफीबरोबर द्यावे, म्हणजे झोंप येते आणि शूळ वेदना नष्ट होतात.

कांही माणसांत वरील चार हृच्छूलांचे भेदापैकी एकापेक्षा अधिक भेद एकाच व्यक्तीमध्ये झालेले आढळतात. तसेंच कांहींच्या बाबतीत मुष्टीमैथुनाचे कारणही आढळते. असो ! हृदयरोगांच्या अनेक प्रकारांत नव्य सूतशेखर अनुपान भेदाने उपयुक्त आहे. त्यापैकी येथे थोडेसे दिग्दर्शन केले आहे.

हृदयकोश विस्तार (Dilatation of the heart म्हणजेच Cardiac dilatation) हृदयाची पोकळी त्याचे स्नायू ताणले जाऊन पातळ होऊन पसरट झाल्यामुळे वाढते आणि हा रोग निर्माण होतो. ही हृदयाची विकृति अनेक कारणानी झालेली आढळते. हृदयास सतत अधिक काम पडू लागले म्हणजे त्याची अशी विकृत वृद्धि होते. मूत्रपिंडाचे विकार, पांडूरोग, शोथ, आमवात, उदर, सान्निपातिक ज्वर, दुर्घटनेचा आघात मनावर तीव्रतेने होणे, हृदय पिळवटून निघण्यासारखा प्रसंग उद्भवून मनावर दुर्दम्य परिणाम होणें, अनेक रोग विकृतीमुळे स्त्रोतोरोध होणें, वासनाचे जबर उद्दीपनामुळे मनाला बांध घालणें अशक्यप्राय होणें, तीव्रतर कष्ट करणें भाग पडणें किंवा एकाएकी शक्तिपात–बलक्षय

होणें इत्यादी कारणानी, तसेंच मद्यपानातिरेक, अति तम्वाखूसेवन आदि करणानी हृदयाची डावी बाजू रक्तवाहिन्यामधील स्नायूंचे कोश ताणले जाऊन त्यांचे थर पातळ होतात, आणि सर्वंच हृदय-कोश विस्तारित होऊन; हा भयावह विकार जडतो. बेचैनी, ताप, तीव्र गळाठा, निद्रानाश, सूज, रात्र जड जाणें, हृदयवेदना, अंगांत त्राण न उरणें, तीव्र दौर्वल्य, डोळ्यावर झांपड, श्वासकष्ट, बोलायलाही अवसान नसणें अशी अवस्था होते. जीविताची शाश्वती उरत नाहीं. अशावेळीं नव्य सूतशेखर ½ गुंज, दरदेश्वर ½ गुंज एकत्र करून दुधाबरोबर दिवसांतून ४ वेळ सतत कांही दिवस देत राहावें. या मिश्रणानें हळूहळू सुधारणा दिसू लागते.

हृदयाची अतिवृद्धि ( Hypertrophy) हा हृदयविकार झाला असतां हृदयाकार वाढून ते बरेच खाली लोंबकळते. हा विकार स्त्रियांपेक्षा पुरुषात अधिक आढळतो. हा होण्याचें कारण म्हणजे रक्तदाब जो दोन प्रकारचा १ निज (Benign बिनाईन) आणि २ उपद्रवी किंवा घातक (Malignaut) आढळतो. त्यामुळे तसेच महाधमनीमध्ये रुधिराचे पुनरावर्तन (Aortic regurgitation), महाधमनी पुटाचा अवरोध (Aortic stenosis) द्विदल पुटापूर्णतेमुळे रक्ताचे पुनरागमन (Mitral regurgitation), मांसपेशीच्या चिरकारी शोथवर्धनामुळें (Healed Chronic myocardition) किंवा हृदयमांस पेशी शोथ बरा झाल्यानंतर हृदयावरण चिकटून बसणें (Adhernt Pericardium) इत्यादि विकृति होत. तेव्हां या हृदयाच्या विकारांत कारणानुरुप चिकित्सा करावयाची म्हणजे ती अशी कीं, रक्तदाबामुळे हृदयातिवृद्धि असेल तर नव्य सूतशेखर १ गुंज, सर्पगंधाचूर्ण ¼ गुंज एकत्रून पुनर्नव्याच्या काढ्याबरोबर दिवसांतून ३ वेळ द्यावा. घातक रक्तदाबजन्य हृदयातिवृद्धि असेल तर नव्य सूतशेखर २ गुंजा + नागार्जुनी

गुटिका ४ गुंजा एकत्र करून ४ भाग करावेत. एकेक भाग दिवसां-तून ४ वेळ पाण्याबरोबर द्यावा. धीराने या चिकित्सेचा अवलंब केल्यास हळूहळू आरोग्य लाभाकडे वाटचाल होत आहे असें आढळेल.

महाधमनीमध्ये रुधिराचे पुनरावर्तन या अवस्थेत नव्य सूत-शेखराचे कार्य वाखाणण्यासारखे आहे. पण या दुष्ट विकाराचे अवस्थाभेद व त्याचा उद्भव कोणत्या कारणाने झालेला आहे; हे पाहिल्याशिवाय चपखल योजना करता येणार नाही, म्हणून थोडक्यांत दिग्दर्शन असे कीं, महाधमनीमध्ये रुधिरांचे पुनरागमन बहुधा दोन कारणानी आढळते. एक चिरकारी आमवातज महाध-मनी अंतर्गत झडपामधून रुधिराचे प्रत्यावर्तन (Rheumatie Aortic Regurgitation) आणि दुसरा जुनाट झालेल्या फिरंगरोग-जनित आमविषाचे किंवा फिरंगरोग विष प्रभावामुळे हृदयाचे महाधमनीमधील झडपामधून रक्ताचे परत फिरणें (Syphilitic Aortic regurgitation) या दोहोपैकी आमवातज धमनी रुधिर प्रत्यावर्तन विकारात १ गुंज, नव्य सूतशेखर १ गुंज, शुल्ब-नागेन्द्राबरोबर द्यावा. अशी एकेक पुडी दर ३ तासास आलेरस मधासह द्यावी.

फिरंगज हृद्धमनी रुधिर प्रत्यावर्तन विकारांत नव्य सूतशे-खर एक गुंज + $\frac{१}{६}$ गुंज तुत्थसव्वीर योग = १ पुडी तूपसाखरेसह सकाळी द्यावी. तूपसाखर नसेल तर सायसाखरेसह द्यावी. याप्रमाणें रोज एकच वेळ सकाळी तुत्थसव्वीर योग नव्य सूतशेखराबरोबर योजावा. दुपारी व रात्री केवळ नव्य सूतशेखर १ गुंज चोपचीनी ४ गुंजा एकत्रून होणारी एकेक पुडी पाण्यासह अगर दूध, चहा, कॉफीसह द्यावी. रोगोपशम दिसू लागतांच तुत्थसव्वीर हे सहकारी

औषध बंद करून केवळ नव्य सूतशेखरच सतत कांहीं काल देत राहिल्याने आरोग्य लाभ संपूर्ण मिळतो. हीच प्रथा वर्णिलेल्या सर्व विकारावरील चिकित्सेत पाळावी; कारण संपूर्णपणे व चिरंतन आरोग्य देणारा हा नव्य सूतशेखर कल्प आहे.

कृमिजन्य हृद्रोगांत हृदयांत तीव्रकळा, अंधेरी, शोथ, पांडुता, सर्वांगखाज आदि त्याचप्रमाणें कांही रोग्यांत मलावरोध, मळमळ, तोडांत थुंको जमा होऊन वरचेवर थुंकण्याची प्रवृत्ति, नेत्राभोंवती काळिमा ही लक्षणे आढळतात. अशावेळी नव्य सूतशेखर १ गुंज कृमिमुक्तियोग १ गुंज एकत्र करून एक पुडी पाण्याबरोबर सकाळी, अशीच दुपारी व रात्रीही द्यावी. या योगानें सर्व प्रकारचे कृमिविकार व कृमीही हृद्रोगासह नष्ट होतात.

## मूत्रवहस्त्रोतसावर कार्य–

मूत्रवहस्त्रोतसे म्हणजे मूत्रपिंडे, गविनी (वृक्कते मूत्राशय यांना जोडणाऱ्या मूत्रवाही नलिका) पौरुष ग्रंथी (Prostate) यांवर नव्य सूतशेखराचे कार्य अप्रतिम होते. नव्य सूतशेखर १ गुंज, इंद्रजवचूर्ण भरलेल्या व पुटपाक केलेल्या खारकेसह सकाळी खावून वरून दूध किंवा पाणी प्यावें. याप्रमाणें सकाळ सायंकाळ रोज २ वेळ केल्यानें शौचाला घट्टच पण पुष्कळ होऊ लागते; व मूत्रही भरपूर येऊ लागते. या प्रयोगाने मूत्रपिंड शोथ, मूत्रांतून नानाप्रकारचे लाळेसारखे पदार्थ जाणें, खर पडणें, मूत्र दुधासारखे पांढऱ्या रंगाचे होणें, प्रमेहाचे सर्व प्रकार, पौरुष ग्रंथीची शिथीलता आदि वृद्धपणीच्या विकृतिजन्य व्याधीं नष्ट होतात. तैलाम्ल, तिखट आहारातून कांही दिवस वर्ज्य करावेत.

नाळगूद (नेफ्रायटिस), मूत्रपिंडे खराब होऊन एखादे बंद पडणें यावर नव्य सूतशेखर ३ गुंजा + गोमूत्राभावित प्रवाळभस्म

३ गुंजा = ३ पुड्या करून एकेक पुडी दिवसातून ३ वेळ द्यावी, किंवा नाळगुद म्हणजे ज्याला सर्वांग शोथही म्हणतात; त्यावर नव्य सूतशेखर १ गुंज + शोथहर लोह १ गुंज + पुनर्नवाचूर्ण २ गुंजा = १ पुडी, अशा तीन पुड्या करून त्या दिवसांतून ३ वेळ पाण्यासह द्याव्यात; व सकाळी एक वेळच जलपिंपळी आणि वाम्वी (जलब्राह्मी) दोन्ही ओल्याच वाटून रस काढावा. त्या रसांत बकरीचे मूत्र मिळवून गरम करून रोग्याच्या सर्वांगाला फासावें; फांसल्यावर ते सुकले म्हणजे मग थोड्या वेळाने गरम पाण्यांत फडके भिजवून पिळून झटपट अंग पुसून काढावें. याप्रमाणें रोज एक वेळ असे ३ दिवस केल्यानें ही मूत्रपिंडे बिघडून होणारी सर्वांगशोथाची सूज ओसरते. या वनस्पति न मिळाल्यास सोनवेल किंवा अमरवेली (आकाशवेली) चा रस रोग्याचे सर्वांगास लावावा.

नाळगुदावर नव्य सूतशेखर १ गुंज + कोंबड्याची भस्म केलेली विष्ठा २ गुंजा एकत्र करून एक पुडी सकाळी तशीच दुपारी व रात्रीं पाण्यासह द्यावी. सात दिवसांत सूज ओसरू लागते. २१ दिवसांत संपूर्ण नष्ट होते. नाहीतर आपट्याच्या सालीचे चौथाई काढ्याबरोबर नव्य सूतशेखर सकाळ संध्याकाळ दिला असतां, आणि मीठ वर्जून केवळ गाईचे दूध, भात एक आठवडा; नंतर वरणभात किंचित सेंधेलोण वापरून ७ ते १४ दिवस दिल्याने लघवीला जादा होऊन सूज ओसरते. याच औषधाने गंडमाळाही नष्ट होतात.

### शोथघ्न प्रभाव–

मस्तिष्क शोथ, मस्तिष्कावरण शोथ (Maningitis किंवा Encephalitis) याचे अनेक प्रकार आहेत. हे एका

अवयवापुरते झाले. प्रत्येक अवयवांचे, शरीरस्थ धातूंचे वेगवेगळे शोथ असतात, ते सर्वंच्या सर्व उध्दृत करणें या प्रबंधांत अशक्य आहे. चरकसंहितेत सांगितल्या प्रमाणें–

शोफास्तु गात्रावयवाश्रितास्तु,
ये ते स्थान दूष्याकृति नाम भेदात् ।
अनेक संख्याः कतिचित् च तेषां,
निदर्शनार्थं गदतो निबोध ।।

च. चि. अ. १२ श्लो. ७४.

म्हणून मेंदू व त्याचे आवरणाचे शोथ, मूत्रपिंड शोथ–नळगूद, लहान मुलांत क्वचित मोठ्या मनुष्यात आढळणारा घटसर्प (घशामधील डिप्थेरिटिक) शोथ, टॉन्सील्स वाढणें, नाकांतील मृद्वस्थि आवरण शोथ–यालाच प्रचारांत नाकांतील हाड वाढले असे म्हणतात. यकृत विकारजन्य शोथ, हृदयविकारजन्य शोथ इत्यादि नानाप्रकारचे शोथांत नव्य सूतशेखराचें कार्य अगदी वाखाणण्याजोगे दिसते. उदाहरणार्ण–

मस्तिष्क व त्याचे आवरणाचे शोथ (एन्केफेलायटिस) या विकारांत नव्य सूतशेखर २ गुंजा + सूक्ष्मसमीरपन्नग १ गुंज किंवा सूक्ष्म मल्लसिन्दूर १ गुंज + अभिनववातविध्वंस १ गुंज एकत्र करून त्याचे मधांत चाटण करून पांच पांच मिनिटाला देत राहावें, म्हणजे उपशम दिसू लागतो. ज्वर कमी होतो. डोळ्याच्या बाहुल्या सरळ होऊ लागतात. मानेचे मणके सैल पडू लागतात. स्पर्श, ध्वनि, प्रकाश यांचे असहनीयत्व जाऊन रोग्याची मूर्च्छितावस्था नष्ट होते. पाठीच्या वेदना नाहीशा होतात.

मूत्रपिंडाच्या शोथांत म्हणजे प्रचारात ज्याला नाळगूद म्हणतात, त्यावरील नव्य सूतशेखराचा उपयोग मागे मूत्रवहस्त्रोतस स्तंभात सांगितलाच आहे.

घटसर्प शोथांत नव्य सूतशेखर ४ गुंजा + मल्लभस्म सूक्ष्म ४ गुंजा + शीलोदक प्रस्तरयोग ८ गुंजा एकत्र करून मधासह चाटण तयार करावे. ते घटसर्प झालेल्या रोग्यास एकेक बोट दर पांच पांच मिनिटास दिवसभर चाटवावे, आणि रात्री झोपते वेळी तालकद्रुति कापसाचे बोळ्यानें घशांत सगळीकडे फिरवावी. असा क्रम तीन दिवस केल्यानें हा दुष्ट व घोर विकार नष्ट होण्याच्या मार्गास लागतो व एका सप्तकांत रोग्याला आरोग्य लाभ मिळतो.

कण्ठ शाळूकाचे (टॉन्सीलायटिस) शोथावर नव्य सूतशेखर १ गुंज + त्रिभुवन कीर्ति १ गुंज + गोदंती भस्म ३ गुंजा + सीतोपलादि चूर्ण ३ गुंजा यांचे मिश्रण मधाशी अगर साखरेच्या पाकाशी दिवसांतून ४ वेळां चाटून खाण्यास द्यावें. ७ ते २१ दिवसानी आरोग्यलाभ होतो.

नाकातील मृदु अस्थि (कार्टिलेज) आंतून सुजतात आणि श्वासोच्छ्वासाला फार अडचण येते. डोके, कान, नाक, घसा आदि अवयवात वेदना सुरू होतात. अशा अवस्थेत नव्य सूतशेखर १ गुंज, त्रिफळा ३ गुंजा, ज्येष्ठमध ३ गुंजा, गोदंती भस्म १ गुंज एकत्र करून सकाळीं एक पुडी पाण्याबरोबर द्यावी. अशीच एक पुडी दुपारीही आणि रात्री झोपते वेळी द्यावी. नाकांत षड्बिंदु तेल अगर घृत सुधाबिंदु तेल मिळविलेले (षडबिंदु तेल किंवा षडबिंदु घृत १ औंस + सुधाबिंदु तेल १० थेंब एकत्र मिळविलेले) १-२ थेंब सकाळ संध्याकाळ घालीत जावें. याप्रमाणें महिनाभर उपचार केल्यानें नास्तास्थिवृद्धि नष्ट होत जाते.

यकृत विकारज शोथावर- नव्यसूतशेखर ३ गुंजा + दारुहळदीचे चूर्ण ६ गुंजा + रक्तरोड्याच्या सालीचे चूर्ण ३ गुंजा एकत्र

करून त्या मिश्रणाच्या तीन पुड्या बांधाव्यात; आणि विस्तवावर भाजलेल्या कोरफडीच्या पानातून निघालेला रस २ लहान चमचे तितकाच मध मिळवून त्यामध्ये एक पुडी सकाळी, एक दुपारी व एक रात्री याप्रमाणें तीन ते सात सप्तके दिल्यानें निश्चित गुण येतो. त्या योगानें कावीळही बरी होते. दम, धाप, कास नष्ट होतात. शौचास साफ होते आणि भूकही खुलून लागते.

हृदय विकारजन्य शोथावर नव्य सूतशेखर यमाश्म भस्म (अकीक भस्म), प्रवाळ पिष्टी, शृंगभस्म, अर्जुनसालीचा घन समानभाग मिळवून त्यांतून द्यावें. यातच शोक्तीक पिष्टी मिळविल्यास हरकत नाहीं गुण वृद्धि होते.

## श्लीपद (फायलेरिया किंवा एलिफण्टायसिस)–

श्लीपदावर नित्यानंद रसासारखाच या नव्य सूतशेखराचा उपयोग होतो. नव्य सूतशेखर ३ गुंजा + लक्ष्मीविलास ३ गुंजा एकत्र करून त्याच्या ३ पुड्या करून त्या गोरखमुंडीच्या ऊर्ध्वपातित अर्कासह दिवसांतून तीन वेळ द्याव्यात; म्हणजे ७ ते १३ आठड्यानीं श्लीपद नष्ट होते; नाहीतर नव्य सूतशेखर २ गुंजा + श्लीपदनाशक गण ८ ते १२ गुंजा = १ पुडी. याप्रमाणें दिवसांतून ३ वेळ पाण्याबरोबर दिल्यानें तीन महिन्यांनी श्लीपद नष्ट होते. स्थानिक उपचार म्हणून महापुरुषाची पानें किंवा वरधारेची पाने वाटून केलेली लुगदी श्लीपदावर बांधावी. दगडीच्या पाल्यासह तो जर १० तोळे असेल तर अर्धा तोळा मोरचूद घालून वाटून श्लीपदावर लेप द्यावा. नव्य सूतशेखर २ गुंजा + सत्पुरुषाचे सालीचा घन २ ते ४ गुंजा एकत्र करून सकाळी पाण्यासह खाण्यास द्यावे. याचप्रमाणें दुपारी व रात्रीही दिल्यानें सुमारे दोन महिन्यांत श्लीपद नष्ट होऊं लागते.

श्लीपदावर सत्पुरुषाची मुळी किंवा गेळफळ उगाळून श्लीपदावर लावणें. नारू प्रमाणेंच पांढरा पण घोडयाच्या केसासारखा सूक्ष्म, पण दीड इंच लांबीचा ज्याची मादी तीन इंच असते असा श्लीपदाचा तंतुकृमि दिवसा मनुष्याच्या शरीरातील खोल रक्त वाहिन्यांत लपून राहतो. मध्यरात्रीनंतर त्वचेतील रक्त वाहिन्यात फिरत राहतो. माणसाच्या शरीरांत हा डांस चावून त्यावाटे शिरतो, आणि इतका भरमसाठ संख्येने वाढतो कीं, माणसाच्या शरीरातील रक्त वाहिन्या, लसिका वाहिन्या या जंतूच्या अंडचा पिलानी ठासून भरल्या जातात आणि तो अवयव शिळेप्रमाणें–दगडाप्रमाणें कठीण होऊन बसतो. हा बहुधा जरी पायात होऊन हत्तीचे पायाप्रमाणें पाय होऊन बसतो; तरी पण हाताला, स्त्रियांमध्ये योनीला, पुरुषाचे अंडकोषाला ( मुष्काला ) इत्यादि ठिकाणीही झालेला आढळतो. या रोगाने पीडित झालेले शरीराचे भाग विकृत रस, रक्त, धातू त्या ठिकाणी संचित होऊन तेथील रस रक्तवाहिन्या विस्फारून अति स्थूल होतात–मोठया होतात. कित्येकाना वारंवार ज्वर येत राहतो. .तीव्र पण अनियमित वेदना होत राहातात. अति दु:खदायक असा हा हिडिस दिसणारा रोग महिनोन् महिने पीडा देत राहातो. रक्तात श्वेतकणांची चिकार वाढ झालेली असते. पिष्ठमेहाचा उपद्रव (काईल यूरिया) ही यामुळे निर्माण होतो. पूर्वाचार्यांनी हा रोग होणारे प्रदेश सांगितले आहेत. बहुधा जेथे तुंबलेले पाणी भरपूर असते (अशाच जागी भरपूर डांसा, मच्छरांची उत्पत्ति संभवनीय असतेही) असे आनूप देश किंवा ज्या प्रदेशांत एकच एक ऋतू सतत रेंगाळत राहिलेला असतो. सतत ओलसरपणा तरी नाहीतर सतत उष्णता असणाऱ्या प्रदेशांत हा रोग आढळतो. श्लीपदाच्या रोगाच्या कृमीची मादी डांसाच्या शरीरांतून दंशामुळे त्याच्या सोंडेवाटे माणसाचे रक्तांत येते व तेथे विपुल प्रमाणात ती अंडी

पिलाना प्रसवते. असें जरी असलें तरी शरीरान्तर्गत विकृत दोषांचाही संबंध आहे; म्हणूनच पूर्वाचार्यांनी श्लीपदाचे वातिक, पैत्तिक श्लैष्मिकादि भेद केले आहेत. असो ! यावर वर कांही सहयोगासह नव्य सूतशेखराचा कसा उपयोग करावा ते लिहिलेच आहे. नुकतेच आलेले आणखी थोडे अनुभव नमूद करून हा श्लीपदाचा स्तंभ पुरा करितों. नव्य सूतशेखर २४ गुंजा + विष्णुदंतीचूर्ण ४८ गुंजा + कोलाश्म २४ गुंजा + गोरखमुंडी ४८ गुंजा + वर्धारामूळचूर्ण ४८ गुंजा + पुनर्नवा २४ गुंजा यांच्या एकत्र घोटून २४ पुड्या कराव्यात; म्हणजे एक पुडी ९ गुंजेची होते. दररोज तीन वेळ याप्रमाणें आठ दिवस हे मिश्रण महामंजिष्ठादि काढ्यासह घेण्यास श्लीपदी रोग्याला द्यावे. असे सतत तेरा आठवडे दिल्याने आणि लावण्यास धत्तूरैरण्ड, निर्गुंडी, वर्षाभू शिग्रुसर्षपैः विष्णुदंतियुत लेपं श्लीपदं हन्ति दारुणम् ।। धोत्र्याची पाने व बोंडे, एरण्ड मूळ व बियामधील मगज आणि पानें, निर्गुंडीची पाने व तूरे, वसूची मूळें व पाने, शेवग्याची साल, मोहऱ्या आणि उंदर विम्बीची दांडी ही सारी एकत्र घोटून लेप देण्यालायक झाले म्हणजे श्लीपद झालेल्या भागावर लावावे.

**जलोदर–**

जलोदरावर नव्य सूतशेखर १ गुंज मधाबरोबर देऊन वर कुण्डलीकन्द द्रवसार ३० ते ६० थेंब + पाणी १ औंस एकत्रून पीण्यास द्यावे. कुंडलीकन्द द्रवसार नसेल तर कुण्डलीकंदाचे (कडवंचीचे गड्डे) तुकडे ½ तोळा + मृतसंजीवनी सुरा अदपाव मिळवून एक उकळी येईतो शिजवून गाळून ती सुरा बलाबल-

पूर्वक १ ते २ तोळे पीण्यास द्यावी. ७ दिवस दिल्याने मूत्रावाटे खूब पाणी जाऊन रोग कमी होतो; किंवा नव्य सूतशेखर २ गुंजा + आरोग्यवर्धिनी २ गुंजा + ग्लूकोसाखर किंवा शिरेखिस्त ८ गुंजा एकत्रून पाण्याबरोबर द्यावें; म्हणजे शौच मूत्रावाटे खूब पाणी जाऊन रोग नष्ट होतो. शक्तीप्रमाणें हे किंवा वरील औषध रोज २–३ वेळ याप्रमाणें १–२ आठवडे द्यावें; नाहीतर जलोदरावर नव्य सूतशेखर १ ते २ गुंजा + जलनिर्हरण मिश्रण ८ गुंजा = १ पुडी याप्रमाणें दिवसांतून ३ वेळ पाण्याबरोबर अगर दुधाबरोबर दिल्याने आणि हलका सहज पचण्यासारखा आहार दिल्याने जलोदरातील पाणी लघवी परसाकडे वाटे निघून जाते. पोटावर रुचकीची पाने गरम करून बांधावीत, किंवा गोवऱ्यांची ताजी राख कापडी पातळ पिशवीत भरून त्या पिशव्या पोटावर व पाठीमागं बांधीत जावे म्हणजे त्या राखेवाटेही पाणी शोषले जाते.

## धी, धृति, स्मृतिवर्धन

बुद्धि, धारणा शक्ति, स्मरण शक्ति वाढण्याकरितां नव्य सूतशेखर ३ गुंजा + सारस्वतचूर्ण १२ गुंजा = ३ पुड्या दिवसांतून ३ वेळ पाण्याबरोबर अगर दुधाबरोबर देऊन, जेवणानंतर दुप्पट पाण्याशी दोन वेळ सारस्वतारिष्ट द्यावे. तीन आठवड्यानंतर गुण दिसतो. मेंदूला शांतता लाभून झोप सुधारते. अमानुषोपसर्ग, अपस्मार, उन्माद, स्त्रियोन्माद (हिस्टेरिया) या विकारावर नव्य सूतशेखर १ गुंज + ब्रह्मसोमा मिश्रण ८ ते १२ गुंजा = १ पुडी याप्रमाणें दिवसांतून ३ वेळ पाण्याबरोबर द्यावे. सुमारे ३ महिन्यानी उत्तम सुधारणा दिसते; आणि केस गळती थांबून केसही भरपूर येतात.

## शिरःशूल

वातज किंवा वातपित्तज शिरःशूल (डोके दुखी) उत्पन्न झाल्यास उजवे किंवा डावे बाजूस डोके तीव्रतम ठणकतें. वेदना शंख्वास्थीचे (आंखाचे) वर जवळच असते. नाक चोंदते, नासास्त्रावही असतो; केवळ वातज शिरःशूल असल्यास नाक तर चोंदतेंच; तालु व तोंड कोरडे पडते. तोंडाला चव नसते. भूक लागत नाही. शंख्वास्थीचे ठिकाणी वेदना असतात. शिका येतात. जर एकाच बाजूचे नाक चोंदत असेल तर एकाच बाजूचे आंखाजवळ शूळ असतो.

कोणाकोणाला सर्वच डोक्यांत वेदना-पीडा होत असते. बहुधा हा विकार सायनोसायटिस या नांवाने किंवा न्यूराल्जिआ-न्यूराल्जिक हेडेक अथवा वातसंस्थानीय अपजनन (डी जनरेशन ऑफ नर्व्हज सिस्टिम) या नांवानें ओळखला जातो.

हा रोग रक्तविकार, निर्बलता व दंतविकार, नासापीनस तसेंच चिंतेचे दडपणामुळें उत्पन्न झालेला असतो.

यावर कारणानुरूप चिकित्सा करीत असतां नव्य सूतशेखर कसा उपयोगी पडतो तें पाहा. नव्य सूतशेखर १ गुंज + लक्ष्मी विलास १ गुंज एकत्र करून पाणी, दूध, चहा, कॉफी यांपैकीं एकाबरोबर दिवसांतून ३-४ वेळ द्यावें, म्हणजे वातज व वातपित्तज शिरःशूल शमतो.

शंख्वास्थिवेदना तीव्रतम असतांना नव्य सूतशेखर १ गुंज + लालपुडी २ गुंजा एकत्र करून चहाबरोबर १ पुडी द्यावी. १५ ते ३० मिनिटांत वेदना थांबते.

नाक चोंदतें व नाकांतून चिकट स्त्राव येतो, नासास्थिवृद्धि होऊन तेथें शोथ येतो; त्याकरिता नव्य सूतशेखर १ गुंज + २ गुंजा गैरिक (कांव) किंवा लक्ष्मीविलास १ गुंज = १ पुडी. याप्रमाणें दिवसांतून ३ वेळ दूध, चहा, कॉफी यांपैकीं एका बरोबर द्यावे, आणि नाकांत गाईचे तूप किंवा षड्बिंदु घृत किंवा षड्बिंदु तैल याचे मर्ष किंवा प्रतिमर्ष नस्य ३ ते ७ दिवस द्यावें. पुड्या मात्र ६-७ आठवडे द्याव्यात.

## नानाप्रकारचे व्रण आणि नव्य सूतशेखर-

नानाप्रकारच्या व्रणांची चिकित्सा चालू असतां, मग ते सद्योव्रण (जखमा) असोत किंवा जुनाट पूंवळणारे सडत चाललेले घाणकट व्रण असोत ते लौकर बरे होण्यास मदत म्हणून, नव्य सूतशेखर १ गुंज तूपसाखरेबरोबर दिवसांतून ३ वेळ देत जावा; किंवा नव्य सूतशेखर १ गुंज, गोदंतीभस्म ४ गुंजा = १ पुडी. अशा ३ पुड्या दिवसांतून ३ वेळ द्याव्यात, म्हणजे पूयोत्पत्ति थांबते. व्रण लौकर लौकर भरून येतात. अहिवंगभस्म ½ गुंज + नव्य सूतशेखर ½ गुंज एकत्रून दुधाचे सायीसह किंवा लोण्याशी अथवा तूपसाखरेशी दिल्यानेही व्रणांत पूयोत्पादन होत नाहीं. ते लौकर लौकर सुकत जातात. सडलेला व्रण किंवा घाणकट पूययुक्त व्रण असलेला रोगी आल्यास, त्यालाही वरीलप्रमाणेंच देण्याचे सुरू केल्याबरोबर व्रण शुद्ध होऊ लागून, लौकर भरून येण्याच्या मार्गांस लागतो. व्रणांत कृमि झालेले असल्यास तेही नष्ट होण्यास मदत म्हणून, व्रणांची शोधन रोपण चिकित्सा चालू असतां, हें अहिवंगयुक्त नव्य सूतशेखर मिश्रणाच्या पुड्या देत राहावे.

## कर्काबुद (कॅन्सर) विकार-

कॅन्सर रोगाच्या अनेक प्रकारावर नव्य सूतशेखराचा उपयोग होतो. ल्यूकीमिया-ब्लड कॅन्सरमध्ये रक्त कण अत्यल्प तयार

होतात व पांढरे कण मात्र भरमसाट वाढतात व प्लीहावृद्धि फार असते. रोग्याचे जीवित क्षणाक्षणाला धोक्यांत येत असतें. त्यावर नव्य सूतशेखर २४ गुंजा + व्यंकटेश्वर रस २४ गुंजा एकत्र करून २४ पुडचा कराव्यात. एकेक पुडी मज्जाघृताशी दिवसांतून ३ वेळ याप्रमाणें ८ दिवस द्याव्यात. सुधारणा दिसते. याप्रमाणें १३ आठवडे दिल्यानें आरोग्य लाभ होतो.

गळ्यापासून गुदद्वारापर्यंतच्या कोणत्याही आंतरावयवांत अर्बुद विकार निर्माण झाल्यास, नव्य सूतशेखर १ गुंज मधासह अगर दूध, चहा, कॉफी आदि पेय पदार्थासह सतत कांही काळ नियमितपणें देत राहावे. रोग हळहळू हटत आहे असे आढळेल. अन्ननलिकेत, जठरात, लहान वा मोठ्या आंतड्यांत कर्कार्बुदग्रंथी वाढून मार्ग रोध निर्माण झाल्यास नव्य सूतशेखर १ गुंज मधाबरोवर चाटवून वरून वरुणादि काढा गरम गरम २ ते ५ तोळे पाजवावा. या योगानें अनेक वेळा उत्तम गुण दिसून आला आहे. मार्गरोध निश्चित पण आस्ते आस्ते ३६ ते ७२ तासांत का होईना खुला झाल्याची उदाहरणे आहेत. दिवसांतून ४-६ वेळ औषध द्यावे.

यकृत्, स्वादुपिंड, मूत्रपिंडे, पौरुष ग्रंथी, गर्भाशय, रजोवाही नलिका आदि स्त्री जननेंद्रिये यांच्या ठिकाणी झालेल्या अर्बुदांची चिकित्सा चालू असतां; त्या त्या कारणानुरूप औषधे योजीत असतां, त्या औषधाना अधिक बल प्राप्त होण्याकरितां त्यांच्याबरोबर या नव्य सूतशेखराची योजना करावी; म्हणजे 'अधिकस्य अधिकं फलम्' या न्यायाने यशाचा वाटा आपलाच.

**नव्य सूतशेखराचे वृष्य कार्य-**

वृष्यं = मनोहर्षणम् । मनसो हर्षणं यच्च तत्सर्वं वृष्यमच्यते। मनाला आनन्दोत्साह देणारे ते सर्व वृष्य पदार्थ होत. स्वस्थस्योर्जस्करं

यत्तुतद् वृष्यम् । चरकचि. अ. २ चतुर्थ पाद श्लोक ३६ मध्ये असे म्हटले आहे की- यत् किंचित् मधुरं स्निग्धं जीवनं बृंहणं गुरु। हर्षणं मनसश्चैव सर्वं तद् वृष्यंमुच्यते । निरोगी मनुष्यास ओजस्वी बनवणारे जे जे द्रव्य ते ते सर्व वृष्य समजावे. चरक संहितेत आणखी असे म्हटले आहे की- जे कांही मधुररसात्मक, स्निग्ध (चिकणे), चेतना देणारे, बृंहण म्हणजे पुष्ठिकर गुरु गुणाचे अथवा गुरु विपाकि, मनाचा उत्साह वाढविणारे, मनोल्लसित करणारे ते सर्व वृष्य गुणांचे समजावे. या वृष्य द्रव्यांचा गुण असा आहे की, ही द्रव्ये धातुपोषण क्रमाचा व्यतिक्रम करून, आपल्या आंगच्या अचिन्त्य शक्तिप्रभावाने सरळ शुक्रधातूचीच पुष्ठी करितात; म्हणून अशा या त्यांच्या गुणांचा धर्म नव्य सूतशेखराचे साहाय्यानें वर्द्धिष्णु होऊन, त्याचा परिपोष लौकर झालेला दृष्टोत्पत्तीस येतो. कसे तें पाहा. बस्ताण्ड हें वृष्यतम आहे, म्हणून बस्ताण्डकल्प ४ गुंजा + नव्य सूतशेतखर १ गुंज एकत्र करून दिल्याने, वृष्यत्व फार जलद प्राप्त होते. या गुणाचा फायदा असा आहे की, कोणत्याही रोगांत तो रोग शरीरांतून जलद-शीघ्रगतीनें बाहेर काढून लावण्याकरितां शरीर झगडत असतेच. त्याच्या या कार्याला मदत पोहोंचविण्याचे कार्य ही वृष्य द्रव्ये करितात. वृष्य द्रव्यानी प्रतिकार शक्ति प्रबल होते; म्हणून शरीराकडून रोग नाशही जलद घडवून आणण्यास या द्रव्यांचा उपयोग करावा. पण ही द्रव्यें गुरुपाकी असतात, म्हणून जलद कार्य प्रवण करण्यास त्यांचेसह नव्य सूतशेखराची योजना केल्यास अपेक्षापूर्ति होते. कार्य जलद घडते.

आहारस्य परंधाम शुक्रं तद् रक्ष्यमात्मनः ।
क्षयो ह्यस्य बहून् रोगान् मरणं वा नियच्छति ।।

चरक नि. ६-८-१०

शरीरधारणार्थ आहार घ्यावा लागतो. त्या आहाराचा परम उद्देश परम शेवट म्हणजे शुक्रधातूची उत्पत्ति होय. त्या शुक्रधातूचे रक्षण हे आद्य कर्तव्य आहे; कारण त्याच्या क्षयानें बहुतेक रोगांची उत्पत्ति होते. फार काय मरणही येते; म्हणून या तत्वाचा आधार घेऊन शुक्रधातू बलवान करणाऱ्या वृष्य द्रव्याना शरीरांत घेताना, त्यांना शीघ्र कार्यप्रवण करून रोगहनन कार्यही जलद व्हावे, म्हणून त्या द्रव्य संयोगाने वैद्याने आपले उद्दिष्ट साध्य करावयाचे असते. बस्ताण्डकल्पाप्रमाणेंच जलतीरजात शशक वीर्य (जुंद विदस्तर), पूति खट्टासि म्हणजे जवादीमार्जार वीर्य यांचेसह नव्य सूतशेखर योजिल्यास वृष्यवाजीकर कार्य उत्तम प्रतीतीस येते. जुंदविदस्तर १ गुंज + नव्य सूतशेखर १ गुंज एकत्र करून साखरे सह, तूपमधासह, दुधाचे सायीसह इत्यादि कोणत्याही एकासह दिवसांतून दोन अगर तीन वेळ द्यावे. तद्वतच जवादीमार्जार कस्तूरी ½ गुंज + नव्य सूतशेखर १ गुंज एकत्र करून पानाच्या विडचातून दिल्यानेंही वृष्य वाजीकर कार्य होते. वाज = वीर्य वाजीकर = वीर्य उत्पादक. वाजी = वीर्यवान्, पराक्रमी हा अर्थ इथे अभिप्रेत आहे.

## दीर्घायुष्यकर रसायन असें नव्य सूतशेखराचे कार्य–

नव्य सूतशेखराचा अकालीं आलेले वृद्धपण नष्ट व्हावे म्हणून-ही उपयोग होतो. कोण्या साहित्य कोविदाने म्हटले आहे की, "यौवनाचा पारा उडून गेला म्हणजे, जीवनाचा आरसा भकास दिसू लागतो." दांत गेले, गालफाडे बसली, अमृतकळा लोपली, दृष्टी अधू होऊन चष्मा चेहऱ्यावर येऊन बसला, हातापायाना कांपरे भरून काठीच्या आधारानेच चालणें फिरणें होऊ लागले, कान बधिर झाले, वलीपलीतधारी, जराजर्जर शरीर झाल्यामुळे घरातल्याना

व बाहेरच्यानाही किंबहुना स्वतःलाही जडगीर होऊन बसलेल्या पिकल्या अवस्थेत कसले सुखाचे दिवस अनुभवणार ! तर असलें हें भयकारी म्हातारपण लौकर येऊ नये म्हणून, आलेतर– नाही तरी केव्हांना केव्हां येणारच ! पण निदान तें असें किळसवाणें तरी येऊ नये म्हणून, या नव्य सूतशेखराचा उपयोग फार सुंदर रीतीने करून घेता येतो.

| | |
|---|---|
| नव्य सूतशेखर ५० ग्रॅम | एकत्र करून |
| जीवंती चूर्ण ३०० ग्रॅम | बाटलीत |
| गोरखमुंडी २०० ग्रॅम | भरून ठेवावें. |

दररोज सकाळी साध्या पाण्याबरोबर सुमारे ८ ते १२ गुंजा म्हणजे लहान चमचा भरून घेत राहावे. अर्थातच हें संपेपर्यंत बहुधा वर्ष होते. साधारणतः १० वर्षांच्या मुलापासून ते पन्नाशी साठी उलटलेल्यानी एवढेच नाही, तर त्यापुढे वय झालेल्यानीही घेत राहिल्यास त्यांना वार्धक्यांतील अवकळा येणार नाही; व त्या वयांत होणारा त्रास नष्ट होईल. सर्व इंद्रिये कार्यक्षम राहून परावलंबित्व येणार नाही. व्याधी होणार नाहींत. सर्व जीवन विनिमयक्रिया यथास्थित चालून सुखशांति, समाधान यथेच्छ उपभोगता येईल. पथ्य नाहीच. हित मित आहार, पहाटेची मोकळी हवा मिळावी म्हणून फिरून येणे, नमस्कारासारखा अल्पायासी व्यायाम पांच दहा मिनिटे करणें आदि पाळलें म्हणजे झाले. सुदीर्घ आयुरारोग्य लाभ होतो.

–( पूर्वार्ध समाप्त )–



# नव्य सूतशेखर
आणि
# शतयोग प्रबंध

## - उत्तरार्ध प्रारम्भ -

### नव्य सूतशेखरांतील द्रव्यासंबंधी विवेचन–

कज्जली– पारा आणि गंधक समान भाग घेऊन खलांत सुमारें सहा तास ते बारा तास घोटून काळी पूड होते. तीच कज्जली.

कज्जलीकरितां घेतलेला पारा व गंधक संस्कारित हवेत. त्यांना कज्जली करण्यापूर्वी औषधांत घालण्यायोग्य केले पाहिजेत. औषध योग्य पारा पुढीलप्रमाणें शुद्ध करून घ्यावा.

बाजारांतून आणलेला पारा गिंट कापडातून पिळून घ्यावा व तत्समान चुनकळीसह खलांत ३ दिवस घोटावा; नंतर तो धुवून चुनकळिविरहित करून गिंट म्हणजे चिवट कापडातून पिळून घेऊन एक दिवस लसणीचे रसासह घोटावा. लसणीचे ¼ सेंधेलोण मिळवून घोटल्यानें लसणीचा रस निघतो. तो पारा घालून सहज घोटतां येईल एवढा घ्यावा. नंतर पाणी घालून धुवून पारा वेगळा करून बाटलीत ठेवून द्यावा. कोणत्याही औषधी योगांत हा शुद्ध झालेला पारा घ्यावा.

पारा नसेल तर हिंगूळ आणून त्यातून पारा उडवून काढून घ्यावा. तोही उत्तम औषध योग्य असतो. हिंगूळांतून पारा काढण्याचीं रीत–एका फडक्यांत हिंगुळाचे तुकडे लपटून त्या काप-

डाचा चेंडू करावा. एका मातीचे झाकणीत तो ठेऊन त्यावर थोडे रॉकेल ओतून पेटवावे व त्या झाकणीवर दुसरी झाकणी अगर मडके असे झाकावे कीं दोहोत थोडी फट राहून पेटवलेले कापड न विझतां धुमसून जळत राहील. दोन्ही झांकण्यांचे आंतून अगोदर एरंडाच्या पानांचा रस चोळावा व कापड पेटवल्यावर वरील झांकणी बूड थंड राहाण्याकरितां एरंडाची ओली पाने सुमारे १०-१२ एकावर एक रचून ठेवून द्यावीत. सुमारे ६ तासानी किंवा १२ तासानी सर्व चिंध्या जळून हिंगूळातून सुटा झालेला पारा दोन्ही झांकण्यांचे आंतून लागलेला मिळेल. तो कुंचल्यानें झाडून गोळा करावा आणि जाड फडक्यातून पिळून बाटलीत भरून ठेवावा. हाही औषधांत घालण्यायोग्य असतो.

गंधकाची शुद्धी–साजुक तूपांत गंधकाचे खडे भिजवून ते खडे दूध भरलेल्या भांड्याच्या तोंडावर बांधलेल्या फडक्यावर ठेवावेत. त्या खड्यावर निखारे भरलेली झांकणी ठेवावी. झांकणीचे तापलेले बूड गंधकास लागून गंधक पातळ होऊन भांड्यांतील दुधांत पडतो व घट्ट होतो. तो घेऊन पुसून कोरडा करून घोटून ठेवावा. हा औषधात घालण्यायोग्य होय

## ताप्यहृत ताम्र-

ताप्य म्हणजे माक्षिक, माक्षिकाने भस्म केलेलें ताम्र म्हणजेच ताप्यहृतताम्र होय. त्याची कृति–तांब्याचे कागदाप्रमाणें पातळ केलेले पत्रे कातरून बारीक तुकडे करून घ्यावेत. ते चिंचेचा कोळ व मीठ कालविलेल्या मिश्रणांत ठेऊन सुमारे तास दोन तास उकळलें असतां व पाण्यानें धुवून घेतले असतां भस्म करण्यास योग्य होतात.

शुद्ध केलेले ताम्राच्या पत्र्याचे तुकडे एक भाग व त्यांच्या दुप्पट शुद्ध केलेल्या माक्षिकाचे उखळांत कांडून केलेले चूर्ण घेऊन एक मातीचे झांकणीत ते चूर्ण निम्मे पसरावे. त्यावर ते ताम्र तुकडे ठेवून पुन: उरलेले माक्षिकचूर्ण पसरावे. दुसरी झांकणी झांकून एक मातकापड द्यावे; जर ५० ग्रॅम ताम्र व १०० ग्रॅम माक्षिक असेल, तर १० किलो वजन गोवऱ्या घेऊन जमिनीत एक खड्डा करून त्यांत निम्म्या गोवऱ्या, त्यावर ते झांकणी संपुट, त्यावर उर्वरित गोवऱ्या घालून राकेल ओतून पेटवून द्यावे. सांगावयाची राहिलेली माक्षिकाची शुद्धि–माक्याच्या रसात तासभर माक्षिकाचे खडे उकळून घेतले असतां ते औषधयोग्य होतात.

त्या झांकणी संपुटातून ते झालेले माक्षिकयुक्त ताम्राचे भस्म खलांत घेऊन घोटावे, आणि त्यात २५ ग्रॅम हिंगूळ मिळवून लिंबू रसासह घोटून दहा दहा ग्रॅमच्या वड्या बांधून सुकवाव्यात; नंतर त्या वड्या झांकणी संपुटांत बंद करून ३–४ मातकापडे द्यावीत, आणि ५ किलो वजन गोवऱ्यामध्ये ठेऊन अग्नि द्यावा; काढून घेऊन आणखी २५ ग्रॅम हिंगूळ घालून लिंबूरसात घोटून वरींलप्रमाणेंच वड्या बांधून मुद्रून ५ किलो गोवऱ्यांचे अग्निपुट द्यावे. येथे हिंगूळ शुद्ध करून घेतलेला घालावा. हिंगूळाची शुद्धि–हिंगूळ लिंबूरसासह ७ दिवस घोटावा, वाळवून ठेवावा. हा औषध-योग्य होतो.

अशा तऱ्हेने ताम्राला पहिल्यादां माक्षिकानें नंतर हिंगूळ घालून दोनदां असें एकूण तीनदां अग्निपुट देऊन झाल्यावर ते जे त्याचे भस्म झालेले असते, त्यांत माकारस घालून घोटावे. वड्या बांधाव्यात आणि वरीलप्रमाणेंच ५ किलो वजन गोवऱ्यांचा अग्निपुट द्यावा. असा माकारसासह घोटण्याचा व वडी बांधून झांकणी संपु-

टांत बंद करून मात कापडे देऊन एकूण तीनदां अग्नि द्यावा; म्हणजे सर्व मिळून सहा वेळा अग्निपुट दिला गेल्यानंतर हें ताण्यत ताम्र आम्लजित (Acid Proof) असें तयार होते.

लक्षात ठेवण्याकरितां या ताप्यहृत ताम्राचा श्लोक बनवला आहे-

माक्षिकेन दरदेन संयुतम्
सूक्ष्म ताम्रदल संचयं पुटेत् ।
द्वित्रिवार-मथ भस्मतां व्रजेत्,
आमयौघहरमम्लजिद्भवेत् ।।

द्वि-त्रिवार = २ x ३ = ६ वेळ.

## लोहवैक्रांत भस्म-

लोह वैक्रान्त म्हणजे मँगॅनीज धातू. प्राचीन कालापासून भारतीयाना विदित (माहित) असलेला हा धातू भारतावरील परकीयांच्या आक्रमण कालातील अस्थिर वातावरणांत जीवित वित्ताचीही शाश्वति नसलेल्या अवस्थेत वैद्यगणाना विस्मृत झाल्यास नवल नाही. या छोटयाशा प्रबंधात या संबंधीचा ऊहापोह करण्यास वाव नाही. हा लोहवैक्रान्त सहस्त्रवेधी खनिज पाषाणामधून म्हणजे मँगॅनीज ओअरमधून काढतात.

प्रथम या लोहवैक्रान्ताचे शोधनार्थ तो अग्नीने लालभडक तापवून तिळाचे तेलांत कमीत कमी ७ वेळ तरी विझवावा, किंवा तेलासह चांगला भाजून कोरडा करून घ्यावा. नंतर अश्वमूत्र, अजामूत्र, गोमूत्र यांतून मिळेल ते अथवा सर्वच मिळाल्यास त्यांतही

अग्नीने भाजून कोरडा करून घ्यावा; म्हणजे शोधन संस्कार झाला. त्यानंतर भस्म करण्याकरितां–

हा लोहवैक्रान्त जर १६ भाग असेल तर पुढे लिहिले जाणारे माक्षिकादि चूर्ण १ भाग मिळवून त्रिफळा काढ्यासह खलावे. सुकल्यावर कागदी लिंबूरसासह खलून वड्या बांधाव्यात. झांकणी संपुटात बंद करून मातकापड करावे, आणि गजपुटाच्या खांचेत अग्निपुट द्यावें. याप्रमाणें प्रत्येक वेळीं माक्षिकादि चूर्ण एक भाग मिळवीत व त्रिफळा काढ्यांत आणि कागदी लिंबूरसात खलून वड्या बांधीत १६ वेळ अग्नि दिल्याने या वैक्रान्त लोहाचे योग-योग्य उत्तम भस्म होते. या कृतीप्रमाणें मोठ्या प्रमाणांत घेऊन भरपूर करून ठेवावें.

वेळेवर हें लोहवैक्रान्त भस्म उपलब्ध नसल्यास सहस्त्रवेधी पाषाणाचे भस्मही त्याचे अभावी चालतें. वर लिहिलेले लोहवैक्रा-न्ताचे शोधन मारणादि कृतीप्रमाणें भस्म करून घ्यावें.

या कृतीप्रमाणें कोणत्याही धातूचे भस्म होते.

केवळ लिंबूरसांत ३ ते ७ दिवस घोटणी करून गजपुट द्यावयाचे. पुनः ७ दिवस घोटणी व गजपुट अशी ३ किंवा ७ वेळ गजपुटें दिल्याने ही लोहवैक्रान्ताचे किंवा सहस्त्रवेधी पाषाणाचे भस्म होते.

बचनाग– लहान लहान तुकडे अडकित्त्याने करून ते गोमू-त्रांत उन्हामध्ये भिजत ठेवावेत. सकाळी पहिले गोमूत्र टाकून दुसरें ताजें गोमूत्र घालावें. याप्रमाणें ३ ते ७ दिवस करून पाण्याने धुवून खडखडीत वाळेपर्यंत पसरून ठेवून द्यावेत. नंतर चूर्ण करून बाटलीत भरून ठेवून द्यावे. हा शोधन संस्कार करून औषधांत

जेथे कोठे सांगितला असेल तेथें घालावयाच्या वेळीं ते चूर्ण दुधात कालवून दूध आटवावें. बचनाग चूर्ण न करपेल अशा बेताने दूध आटत आलें म्हणजे मग तो बचनाग औषधात घालावा. या क्रियेला अमृतीकरण म्हणतात.

टांकणखार- मोठाले पांढरे खडे मिळतात ते आणून चुर्णून तव्यावर भाजावेत. फुलून लाही होते. ती औषघात घालावी.

धोत्राबीज- बचनागाप्रमाणें बिया दिवसभर उन्हांत गोमूत्रांत भिजत ठेवाव्यात. सकाळी पहिलें गोमूत्र फेकून देऊन पाण्याने धुवून दुसरे गोमूत्र भरावे. असे ३ ते ७ दिवस करून पूड करून ठेवून द्यावे, आणि औषधात घालते वेळी दुधांत अमृतीकरण करूनच घालावेत.

त्रिकटु- सुंठ, मिरी, पिंपळी समभाग घेऊन केलेल्या चूर्णास त्रिकटु म्हणतात; पैकी पिंपळी हाताला ओला चुना लावून त्यानी घोळसावी आणि तव्यावर किंचित् भाजावी म्हणजे फुगते; मग तीत सुंठ मिरी मिळवून कुटून ८० नंबरच्या चाळणीने चाळून बाटलीत ठेवून द्यावे किंवा वेगवेगळे कुटून एकत्र करून ठेवावेत.

चातुर्जात-दालचिनी, हिरव्या वेलदोडयातील बिया, तमालपत्री, पिवळे नागकेशर यांची समभाग चूर्णे एकत्र केली असतां त्यास चातुर्जात म्हणतात.

उंची कचोरा- कापूर काचरी जी फार सुगंधी असते ती.
चित्राश्म पिष्टी- जहरमोहरा, खताई नामक दगड बारीक घोटून सूक्ष्म केलेल्या चूर्णास हें नांव दिले आहे. डॉ. देसाई आपल्या भारतीय रसशास्त्र या पुस्तकांत म्हणतात- "ह्यांत फार मौल्यवान

व उपयुक्त धातू असतात. उदाहरणार्थ सोने, पांढरे सोने (प्लॅटिनम्), ताम्बे, निकेल, क्रोम आयर्न हा यकृताचे रोगांत देतात."

शंखभस्म- लोध्राच्या सालीचा $\frac{1}{8}$ काढा करावा. त्यांतच लोध्राच्या सालीचे चूर्ण मिळवून घोटून रावडीप्रमाणें घट्ट मिश्रण झाले म्हणजे धुवून साफ केलेल्या शंखाचे तुकडयांना किंचित जाडसर लेप फासावा. वाळवावे. गोवऱ्यांचा चांगला रसरशीत निखारा झाला म्हणजे त्यांत हें शंखाचे तुकडे टाकून त्याच्यावर निखारा पसरून, पुनः थोडया गोवऱ्या वर घालून चांगला विस्तव होऊ द्यावा. लोध्राचा लेप जळून जाऊन शंखाचे तुकडे पांढरे शुभ्र भस्मीभूत होतात. ते घेऊन घोटून बाटलीत अर्ध्यापर्यंत भरून ठेवावें; कारण हे भस्म कांही दिवसानी फुलते. पूर्ण बाटली भरल्यास बाटली फुटून नुकसान होते.

या कृतीनें कवडया, शिंपा, मोती शिंपा (शौक्तिक) यांचेही भस्म करून वर लिहिल्याप्रमाणेंच बाटलीत ती बाटली आर्ध्यापर्यंतच भरून ठेवावी.

या भस्मकृतीत लोध्र हेतुपुरस्सर वापरले आहे. लोध्राची साल संग्राही, स्तम्भन, शोणितास्थापन, लघु, शीतवीर्य, संधाननीय, चक्षुष्य, ज्वरातिसार-नाशक, शोथघ्न, कफपित्त, रक्तपित्त रक्तविकार, त्वग्रोग, प्रवाहिकानाशक आहे. रक्तवाहिनी संकोचक, अत्यार्तवनाशक आहे. कषायत्वामुळे याचें कार्य शरीरातील अन्तस् त्वचेवर, गर्भाशयावर, आंतडयावर त्यांचे शिथिलत्व नाशक असें कार्य घडते. क्षते भरून येतात, म्हणून याचे संयोगानें हीं शंखादि भस्मेंही गुणवृद्धि पावून उत्तम कार्यकारी होतात.

कोंबडनखी-ही सुमारे हात दोन हात उंचीची कोंबडयाच्या शेपटी तुऱ्याप्रमाणें व नाजुक बाकदार एखादेच त्रिदळीपान

येणारी डोंगरी वनस्पति कोंकणांत लोणावळा, खंडाळा, कर्जत आदि भागाकडे आढळते. हिच्यासंबंधी विस्तृत माहिती व गुणधर्मादि साण्डू त्रैमासिकाचा मे १९७४ चा प्रस्तुत लेखकाचा लेख जिज्ञासूनी पाहावा. कोंबडनखीला गाजरी, कांटेमुळी, विंचुमुळी इत्यादि नांवानीही ओळखतात. हिचें मूळ येथे घेतले आहे

उंटकटारी- ब्रह्मदंडीही म्हणतात. कांटेरी क्षुप आहे. हिचे मूळावरील साल येथे घेतली आहे. हिचेंही विस्तृत वर्णन साण्डू त्रैमासिकाच्या फेब्रुवारी १९६५ सालातील अंकात प्रस्तुत लेखकाने दिले आहे.

उंटकटारीचे मूळावरील सालीचा घन- हिचे मूळावरील सालीचा $\frac{१}{१६}$ काढा करून त्यांत उंटकटारीचे मुळीची साल सूक्ष्म चूर्ण केलेली मिळवून एकजीव करून उघड्या हवेवर पसरून ठेवून सुकू द्यावी, किंवा एक सोळांश म्हणजे बराच दाट काढा होत आला म्हणजे खाली उतरून अंमळसा थंड झाला म्हणजे उंटकटारीच्या सालीचे चूर्ण इतके मिळवावे कीं मिश्रण घट्ट होऊन त्याचे सांडगे तोडता येतील. सांडगे पाडून ते सावलीत चांगले खडखडीत सुकल्यावर घोटून चूर्ण करून बाटलीत भरून ठेवावेत.

बाळबेलमगज- कच्ची न पिकलेली बेलाची फळे आणून फोडून मगज खरवडून काढावा. तो एक दोन दिवस उन्हांत ठेवून सुकल्यावर किंवा सावलीत हवेवर २-४ दिवस किंवा चांगला सुकेपर्यंत ठेऊन कुटून पूड करून बाटलीत भरून ठेवावा.

माका- भृंगराज किंवा भांगरा म्हणतात. याचेही विस्तृत गुणधर्मादींचा लेख प्रस्तुत लेखकाने आयुर्वेद पत्रिका नासिक १ जून १९५१ साली माका (भृंगराज) नांवानें लिहिलेला आहे. तो पाहावा.

येथून पुढे या प्रबंधांत नव्य सूतशेखराबरोबर जी अनुपानें आणि सहयोग वापरले आहेत, त्यांच्याबद्दलची माहिती क्रमानें देण्यात येत आहे.

सफरचंदाचे (सेवाचे) सरबत-सफरचंदे आणून वियाविरहित खिसून पिळून रस काढावा. त्या रसांत त्याच्या चौपट साखर मिळवून मधासारखा दाट होऊन राहील असा पाक करून ठेवावा, किंवा आयता बाजारात पाक किंवा सरबत विकतही मिळते.

सर्पगंधाचूर्ण– सर्पगंधा मुळ्यांचे चूर्ण. या वनस्पतीस अनेक नांवे आहेत व तिच्या अनेक जातीही आहेत. या प्रबंधात फक्त दोनच जाती वापरल्या आहेत. भारतांत फार प्राचीन काळापासून हिचा वापर जाणकारानी गुप्त ठेऊनच केलेला आहे. हल्ली हिला पागलबूटी, चांदमरवा, सर्पिना नांवानें ओळखतात. हल्ली हिच्यावर पुष्कळ लिखाण झाले आहे. कोंकणात हिला अडकई, हरकायि म्हणतात. प्राचीन नावे-शिवमूलिका, मदघ्नि. सम्राट अशोक, दुसरा चंद्रराजा, यानी व महाराष्ट्रात प्राचीन काळी नरवाहन दत्त, शालीवाहन आदिनी आपल्या राज्यांत राजाज्ञापूर्वक वानस्पतिक उद्यानें करविली होती. सर्पगंधेसारखी अनेक उपयुक्त औषधें जोपासली जात असत. १४ ते १६ व्या शतकांत सर्पगंधेला संस्कृतमध्यें श्वेतविप्र व प्रचलित भाषेंत सेत्तु बरुआ धवल बरुआ नावाने ओळखीत आनंदमाला नामक आनन्दयतीनें लिहिलेल्या हस्तलिखित गंधांत ही नावें आली आहेत. नागार्जुनानें हिचा रसकल्प बनवल्याचा उल्लेख तिथे आहे. मराठवाड्यांत हिला भुईजांभळ नांवाने ओळखतात. शालिवाहन काळातील हिचे नांव जम्बू–भूमिजम्बू, जांबवी ही नांवेहीं वापरली जात.

दाळिंब पाक, दाडिमावलेह– डाळिंबबीजांच्या रसांत चौपट साखर मिळवून मधाप्रमाणें दाट राहील इतपत आटवून बाटलीत ठेवणें. हें पित्तशामक म्हणून अनुपानार्थं वापरता येते.

नेत्र्यगण– पुनर्नवा, माका, सुरवारी हिरडा, जीवंती, कडु-निंबफुले, शतावरी, बाळंत शेपा, कडुजिरे, ज्येष्ठमध व माक्षिक भस्म १।१ भाग एकत्र करणें. मात्रा ४ ते ८ गुंजा गुलकंदासह दिवसांतून ३ वेळ अगर ४ वेळ दिल्यानें नेत्रमंदता, नेत्रविकार आदि नष्ट होतात.

माक्षिक भस्माची कृति– शुद्ध केलेले माक्षिकाचे खडे एरंडे-लाने भिजवून कापडांत गुंडाळून ती गुंडाळी गोवऱ्यांच्यामध्ये ठेऊन पेटवून द्यावी. ते खडे फुलतात व घोटताच सहज चूर्णित होतात. १ किलो खडे असतील तर १० किलो वजन गोवऱ्या घ्याव्यात. ते माक्षिकाचें चूर्ण केळकंदरस घोटण्या इतपत घालून घोटावे. रस आटला कीं पुनः घालावा; याप्रमाणें सात दिवस घोटणी करून वड्या बांधाव्यात. सुकल्यावर झांकणी जोडांत बंद करून १० किलो वजन गोवऱ्यांमध्ये ठेऊन अग्नि द्यावा. नंतर कागदी लिंबूरसांतही याचप्रमाणें ७ दिवस घोटून वरीलप्रमाणेंच अग्नि दिल्यानें भस्म जांभळट तांबडे होते. भस्म गंधरहित झाले पाहिजे. तसे होईपर्यंत लिंबूरसात खल व नंतर अग्निपुट देत राहावे. प्रमाण- १ गुंज दूध, मध, तूप, साखर इत्यादीमधून दिल्यानें हे भस्म उत्तम शक्तीदायक, पित्त रोगांना शामक, आक्षेपकघ्न, नेत्र्य, ज्वरघ्न, राजयक्ष्मानाशक, हृद्य इत्यादि अनेक रोगांवर गुण करणारे आहे. विमल माक्षिकाचेही याचप्रमाणें भस्म करावे.

लोहवैक्रान्त भस्म कृतीत उपयोगीं असलेले माक्षिकादिचूर्ण, शुद्ध केलेले माक्षिक, मनशीळ, हळद, मिरे, त्रिफळा, स्वर्णक्षीरीमूळा-ची साल १।१ भाग एकत्र करून ठेवणें. धातूंची भस्मे करण्यास उपयोगी.

बेलाचा मुरंबा–बेलाचा मगज तुपात परतून त्याच्या चौपट साखरेच्या सरवती पाकांत मिळवून चांगले घुसळून बरणीत ठेवावे. मूर्च्छा, मलावरोध आदि रोगाकरितां पिकलेल्या बेल फळांतील गर (मगज) घ्यावा. अतिसार, आमांश रोगाकरितां अपक्व किंवा कच्चे बाळबेलातील गर घ्यावा, यांत मधही ¼ मिळवल्यास चालते.

बेलपाक– वरील मुरंब्याप्रमाणेंच पण साखरेचा पाक मात्र थंड झाल्यावर बर्फीसारख्या वड्या पाडता येतील असा करावा व वड्या पाडून ठेवाव्यात.

अर्जुनसालीचा घन–उंटकटारीचे घनाप्रमाणेंच

शृंगभस्म– सांबराची शिंगे ज्याना भार शिंग किंवा बारा शिंगी म्हणतात. ती गोवऱ्यांत ठेऊन अग्नि द्यावा; जळून अग्नि उत्तम बसला असतां पांढरी भस्मरूप होतात. काळसर भस्म झाल्यास अग्नि कच्चा बसला असे समजावे. कसेंही भस्म होवो ते कोरफड, नागदवणीची पानें किंवा सिताफळीची पाने यापैकी एकासह अगर सर्वांसह घोटून पेढ्याप्रमाणें वड्या बांधून सुकल्यावर; झांकणी संपुटांत ठेऊन गोवऱ्यांचा अग्नि द्यावा. पांढरे भस्म होते. मात्रा १ ते ४ गुंजा मध, दूध, तूप, साखर आदिबरोबर दिवसातून ३–४ वेळ दिल्याने कफकास, श्वास, हृद्रोग, पार्श्वशूळ, श्वेत प्रदरादि रोग जातात.

लक्ष्मीविलास– कज्जली ४० ग्रॅम, अभ्रकभस्म ४० ग्रॅम, अहिवंग भस्म १० ग्रॅम, रसमाणिक्य ५ ग्रॅम, ताप्यहत ताम्र २½ ग्रॅम एकत्रून घोटावे. नंतर उत्तेजक चूर्ण मिश्रण ११० ग्रॅम मिळवून घोटून शेवटी भीमसेनी कापूर १० ग्रॅम मिळवून घोटावे आणि नागवे-

लीच्या पानांच्या रसांत खलून मात्रा म्हणजे गंधगोळ्याप्रमाणें कांड्या करून, सुकल्यावर बाटलीत भरून ठेवाव्यात. लागेल तशी एकेक कांडी घोटून पूड करून वापरण्यास घ्याव्यात. प्रमाण ¼ ते २ गुंजा. गुणधर्म-हृद्य, वृष्य, स्वेदापनयन, क्षय, कास, दम, पांडू, प्रमेह, वात कफाच्या व्याधी, पित्तक्षीणतेच्या व्याधी, गळाठा, प्रतिश्याय, श्लीपद आदि अनेक रोगनाशक.

उत्तेजक चूर्ण मिश्रण– जायफळ, जायपत्री, गांजाबी, वर्धाराबी, शुद्ध धोत्राबी, तालीमखानाबी, सराठे काटे, बळबीज, सोलीव, शतावरीमुळे विदारी (भुई कोहळा) कंद, भांगपत्ती शुद्ध प्रत्येकी १० ग्रॅम एकत्र करणें, मात्रा– ४ ते ८ गुंजा दूध, तूप, साखर, मध, साय इत्यादि पैकी एकावरोबर दिवसातून १ वा २ वेळ. उत्तेजक, क्षुधा वाढवणारे, वृष्य, वाजीकर इत्यादी लक्ष्मी विलासाच्याच गुणाचे पण कमी प्रमाणांत.

अभ्रकभस्म– काळे वज्राभ्रक (अग्निवर स्थिर राहाणारे) घेऊन अग्नीत लाल करून बोरीच्या सालीचे ¼ शेष काढ्यांत विझवावे. याप्रमाणें ७ ते २१ वेळ विझवल्यानें त्याचा शुद्धि संस्कार झाला.

हें चूर्ण करून ते जर २०० ग्रॅम असेल तर १०० ग्रॅम टांकणखार, सोरमीठ १०० ग्रॅम मिळवून गोमूत्रासह अग्नीवर कढईत शिजवून गोमूत्र आटवावे. नंतर हरभऱ्याची आंब मिळवून वड्या बांधून झांकणी जोडांत ठेऊन मातकापड न करितांच १०० गोवरीचा अग्नि द्यावा. निश्चन्द्र म्हणजे अभ्रकाची चमक मोडून ते तांवडे विटकरी रंगाचे भस्म होते. हरभऱ्याची आंब नसल्यास कोरफड, पांढरे फुलांची सहदेवी, गंगावती (आराम शीतला), अंबूटी यांतून एक अगर सर्वंच घेऊन घोटून वड्या बांधून अग्निपूट

द्यावे. हे भस्म जरी १-२ पुटातच वापरण्या योग्य होते, तरी पण गुण वृद्धीसाठी सवडीप्रमाणें दहा पाच पुटे द्यावीच. दुसरा प्रकार–

केवळ अभ्रक चूर्ण तत्समान सोरमीठ एकत्रून दोहों समान गूळ मिळवून घोटून अग्निपुट दिल्यानेही शुद्धी संस्कार न करितां-ही तांबडे औषध योग्य भस्म होते.

प्रमाण $\frac{1}{4}$ ते १ गुंज कास, श्वास, क्षय, संग्रहणी, ज्वर, अतिसार, पार्श्वशूळ, धातु-वीर्यस्त्राव, इन्द्रिय शैथिल्य, वातविकार हृद्रोग, स्त्री पुरुषांचे जननेन्द्रिय विकार व त्या इंद्रियांची अशक्तता अपूर्ण वाढ आदि अनेक विकृति नष्ट करून आयुष्य वाढविणारें आहे.

अहिवंगभस्म– कथील = वंग अहि = शिसे, शिसें, कथील प्रत्येकी ५० ग्रॅम घेऊन पातळ करून तिळाचे तेलांत ७ वेळ ओतावे नंतर एका मडक्यांत कोरफड रस अथवा निर्गुडीचा रस थोडीशी हळद पूड मिळवून ठेवून एक सच्छिद्र झांकणी त्यावर झांकून पातळ केलेले शिसें कथील त्या छिद्रावाटे ७ वेळ ओतावे शुद्ध होते मग ते पातळ करून त्यावर २५ ग्रॅम आघाडाक्षार टाकून पळीने जलदी घोटावे. लागलीच पूड होते. पुनः एकवेळ २५ ग्रॅम आघा-डाक्षार टाकावा आणि घोटावे मग हरताळ ५ ग्रॅम व मनशीळ ५ ग्रॅम घालून घोटावे. लोहपात्राखाली अग्नि चालूच ठेवावा. मात्र हरताळ मनशीळीचे धुरापासून नाकतोंड डोळ्यांचा बचाव करावा. नंतर ती झालेली अहिवंगाची पूड कोरफड रसांत अथवा रुईचे मुळाच्या सालीचे अथवा पानाचे रसांत ७ दिवस घोटून वड्या बांधाव्या आणि १ किलो वजन गोवरीचा अग्नि (त्या वड्या पणती जोडांत ठेवून मातकापड देऊन) द्यावा. याप्रमाणें ३ अग्नि दिल्यानंतर ते

भस्म औषध योग्य होते. प्रमाण १/८ गुंज ते १/४ गुंज दुधाचे सायीसह अगर लोणी, तूप साखरेसह सकाळ सायंकाळ द्यावें. उत्तम वृष्य, वाजीकर, प्रमेह, मधूमेह, अग्निमांद्य, संधिवात, आमवातघ्न आहे. अनेकरोग घालवते व बहुमूत्रनाशकही आहे. आघाडाक्षार नसेल तर यवक्षार व सर्जिका यांचे समभाग मिश्रणातून २५ ग्रॅम वजन घ्यावे.

रसमाणिक्य– अभ्रकाचे दोन पत्र्यामध्ये हरताळाचे लहान तुकडे ठेऊन कच्च्या दोऱ्याने बांधून त्यावर कणीक लिंपावी आणि निखाऱ्यावर सुमारे पंधारा वीस मिनिटे ठेवावे. एक बाजूने भाजून निघाली की उलटे करून ठेवावे. थंड झाल्यावर खडे तांवडे माणिक रत्नवत होतात तें औषधांत घ्यावेत. मात्रा १/८ ते १ गुंज. मध, दूध, तूप, साय साखर वगैरे. गुणधर्म– कास, श्वासघ्न, ज्वरघ्न, त्वग्रोग नाशक.

भांगपत्तीची शुद्धी– दुधात थोडावेळ शिजवावी दूध आटत आले की उतरून घोटून औषधांत मिळवावी.

सूक्ष्म मल्लसिन्दूर– १ गुंज मल्लसिन्दूर + १०० गुंजा तांदुळाची पिट्टी एकत्रून घोटून ठेवणें. मात्रा १ ते २ गुंजा पिट्टी ऐवजी ग्लूकोसाखर चालते. वातकफाचे रोग नाशक फिरंग, पूतिफिरंगघ्न.

मल्लसिन्दूर– पारा १०० ग्रॅम, रसकापूर १०० ग्रॅम, गंधक ५० ग्रॅम, सोमल ४० ग्रॅम एकत्र घोटून काचकुपीत भरून ४८ तास वालुका यंत्रात पक्व करावे. मात्रा १/१०० गुंज ते १/५० गुंज. शक्ती प्रमाणें १/२० गुंज. गुणधर्म फुप्फुस हृदयोत्तेजक, वातकफाचे रोगनाशक सान्निपातिक अवस्थेत उपयोगी. रक्तष्ठीवन होणारे रोगांत अनुपयोगी.

कडक मोहरीचा अर्क– काष्ठौषधी विक्रेत्याकडे विकत मिळतो.

वंशलोचनाचें भस्म– वंशलोचन चुन्याचे निवळीत भिजवून (३ वेळ) वाळवावा नंतर लोटक्यांत बंद करून थोडका अग्नि द्यावा. पांढरी मऊ पूड होते. हेंच भस्म. मात्रा १ ते २ गुंजा मधांत. घेरी, बेशुद्धी, शीतपित्त, इंजेक्शनाची रिॲक्शन नाशक ॲलर्जी नाशक.

कांव– कांवेचे तांबडे खडे किंचित तूप व दूध लावून खरपूस भाजून घ्यावेत. घोटून बाटलीत भरूत ठेवावेत. औषधात घ्यावेत.

सुधा बिन्दुमलम– सुधा बिंदु द्रव १ औंस, निलगिरी तेल १ औंस, हेमंत हरित तेल (मिथिल सॅलिसिलस) १ औंस, पांढरे वॅसेलीन ६ औंस, मेणबत्तीचे मेण ४ औंस याप्रमाणें घेऊन प्रथम मंदाग्नीनें वॅसेलीन व मेण एकत्र पातळ करून बरणीत ओतावे व बाकीचे पदार्थ मिळवून ढवळून झांकण लावून ठेऊन द्यावे. घट्ट पंकिल (मलम) होते. बाह्योपचारार्थ डोके दुखी, संधिवात, पर्शु-काशूळ (पार्श्वशूळ), न्युमोनिया आदिमध्यें कसल्याही वेदनेंत चोळण्याच्या उपयोगी.

सुधा बिन्दुद्रव– ओवा अर्क रवे (थायमॉल), पोदिना अर्क रवे (पेपरमींट किंवा मेंथॉल क्रिस्टल्स) व कापूर एकत्रून बाटलीत ठेवून द्यावे. आपोआप त्यांचे तेल होते. पोटात घेण्याकरितां १ ते २ थेंब साखरेत, बत्ताशात, पाण्यात किंवा रोगपरत्वे काढ्यात थेंब टाकून देणें. शूळघ्न, वेदनाशामक, विषूची नाशक इत्यादि. याचाहि बाहेरून लावून उपयोग होतो पण कडक आहे.

रसकर्पूर- पारा २० ग्रॅम एका तामचीनी कटोरीत घेऊन त्यावर ३० ग्रॅम गंधकाम्ल ओतावे. गरम करावे. द्रवभाग आटल्या-वर त्यांत खाण्याचे काळसरमीठ १५ ग्रॅम व पारा ५ ग्रॅम मिळवून चांगले घोटून डमरू यंत्रात भरून मंद अग्नि ४ तास द्यावा. वरील भांड्याचे बुडास आंतून रसकापूर लागलेला काढून परीक्षा करून बाटलीत ठेवून द्यावा.

परीक्षा-पाण्यात विरघळत नाही. सव्वीरापेक्षा जड असतो. कडक लवणाम्लात (HCL) गरम केल्यास विरघळतो. चुन्याच्या निवळीत बुडवल्यास काळा पडतो. रंग पांढरा असतो. अमोनियाशी मिळवल्यास करडा होतो.

डमरू यंत्र- दोन मडकी एक मोठे, एक थोडे छोटे तोंडाला तोंड जडवून (लहानांत औषध भरून मग) बंद करावे. हे डमरू यंत्र.

तामचीनी कटोरी = एनॅमल वाटी

विषघ्न गण- चन्द्रमुखी पंचांग अथवा पाने किंवा मुळे; गंगावतीची पाने; बनकुरडूची पाने किंवा बिया अथवा मुळे; महावीरा पानें, बिया; फांगळा पानें अथवा मुळे; रुई मुळावरील साल; वेड्या बाभळीच्या मुळावरील साल अथवा शेंगांचे टर्फल; ईश्वरीमूळ, पानें; तुंबी पाने, बिया; आघाडा पानें, पंचांगाची राख या गणांतील एक अगर अनेक मिळतील तेवढे एकत्र करून त्यांचा रस, काढा, हिम, फाण्ट अगर जाळून केलेली राख यांचेपैकी कोणत्याही एका कल्पासह नव्य सूतशेखराचा उपयोग करून इच्छित फल साधावें.

चन्द्रकला रस- द्विगंध कज्जली ३० ग्रॅम; अभ्रकभस्म १० ग्रॅम, ताप्यहतताम्र १० ग्रॅम, चापट शिंपांची पिष्टी १० ग्रॅम, गुळ

वेलसत्त्व अभावी तांदुळ पिठ्ठी १० ग्रॅम, अनंतमूळ १० ग्रॅम, सुगंधी वाळा १० ग्रॅम, पांढरे चंदन १० ग्रॅम, मधुमालती फुले अभावी वाकेरीमूळ-भाते चूर्ण १० ग्रॅम, एकत्र करून त्यांतच तांबडे कमळ फुलांच्या पाकळ्या, शतावरी, नागरमोथा, कुटकी, पित्तपापडा यांचे काढयाचा घन ५० ग्रॅम मिळवून, दाळिंब बीजरस, दुर्वारस, केवडामूळ रस, गंगावती रस, पांढरी सहदेवी रस, स्त्री दुग्ध अभावी दूध पावडर, कोरफड रस, ग्लूको साखर ही आठ द्रव्ये एकत्र करून घोटून चांगली मिसळल्यावर वरील मिश्रणांत मिळवून चांगला एकजीव झाल्यावर कांडया बनवून सुकवून ठेवाव्या. नंतर लागेल तसें चूर्ण करून वापरावे. मात्रा १ ते ४ गुंजा, सर्व रक्त-स्त्रावी रोग, ज्वर, दाह, मूत्रकृच्छ्र, पित्त विकार घेरी, मूर्च्छा आदि रोगघ्न.

द्विगंध कज्जली– पारा १० ग्रॅम + गंधक २० ग्रॅम यांची कज्जली, पाऱ्याचे दुप्पट गंधक घेऊन एकत्र घोटून केलेली कज्जली.

महालक्ष्मी नारायण - शुद्धहिंगूळ किंवा रससिंदूर, गंधक, शुद्ध टांकण खाराची लाही, बचनाग शुद्ध, अभ्रकभस्म, शुद्ध कुच-लाबीज, रेणुकबीज (निर्गुंडीचे बीज), अतिविष, पिंपळी, इंद्रजव, सेंधेलोण प्रत्येकी २५ ग्रॅम घेऊन दंती मूळाचे काढयात आणि त्रिफळेच्या काढ्यांत वेगवेगळे ३।३ वेळ घोटून १।१ गुंजेच्या गोळ्या अथवा पुड करून ठेवणें शक्तीप्रमाणें मधाशी अथवा आले रस मधाशी किंवा योग्य अनुपानाशी दिल्यानें ज्वर, कफरोग, न्युमोनिया, आंचके–झटके येणें, सर्दी, माथेशूळ, छातीत कफामुळें वा सर्दीमुळे दुखणें–पार्श्वशूळ, बालकांचे आंचकी–झटक्यावर विशेष उपयोगी. २।२ तासास दिल्याने झटके थांबतात. मुलांना ¼ गुंज एकावेळी याप्रमाणें वारंवार द्यावयाचे झाल्यास २४ तासातून ४ गुंजांचे वर देऊ नये.

हिंगूळ शुद्धि– बाजारात हिंगूळ रसकापूर सव्वीर रससिंदूर आदि पदार्थ आयते मिळतात. ते आणून त्यांची शुद्धि करून वापरल्यास चालते. हिंगुळाची शुद्धीहिंगूळ लिंबुरसात ७ वेळ खलून घ्यावा, शुद्ध होतो. रसकापूर बनवून घेतल्यास शुद्धीची जरूरी नाहीं. तद्वतच हिंगूळ बनवून घेतल्यास तो मात्र १ वेळ दुधांत शिजवून घ्यावा. रससिंदूर कणकेत ठेऊन ती कणीक लालसर होईपर्यंत तुपात तळावी. कणीक काढून टाकून रससिंदूर काढून घ्यावा. तो औषधांत घालावा. रससिंदूर बनवून घेतल्यास शुद्धीची जरूरी नाही.

हिंगूळ कृति- सिपीचंद (Hgo) १० ग्रॅम, गंधक २० ग्रॅम, पारा ६० ग्रॅम एकत्र घोटून ताम्रपात्रांत बंद करून अग्नि दिल्यानें हिंगूळ बनतो. सिपीचंद हे गिरिसिंदूराचे बाजारी नांव आहे. यास इंग्रजीत रेड मर्क्युरि ऑक्साईड म्हणतात. या इंग्रजी नांवाने केमिस्टकडे विकत मिळतो. ताम्रपात्रा ऐवजी काचकुपीत घालून मातकापड करून वाळूका यंत्रात पुरून अग्नि १२ तास द्यावा लागतो. ताम्र पात्रांत केल्यास अग्निपुट द्यावे लागते ते कमी वेळांत होते.

सव्वीर कृति– पारा २० ग्रॅम, गंधकाचे तेजाब कडक ३० ग्रॅम, ताम्रचिनी कटोरीत थोडया अग्नीवर उघडया हवेवर गरम करावे. याचा धूर खूब सुटतो व खराब असतो. सुकल्यावर जे भस्म मिळते त्यात १५ ग्रॅम खाण्याचें काळे मीठ मिळवून डमरू यंत्रात बंद करून ४ तास अग्नि दिल्याने वरील मडक्याचे बुडास आंतून सव्वीर लागतो. खालचे मडक्यात खारीमीठ उरते.

सव्वीर परीक्षा– चुन्याचे निवळीने पिवळा रंग येतो. पाण्यात मिसळते. रसकर्पूरापेक्षा जास्त कडक व विषारी आहे.

रससिंदूर– पारा पाव किलो, गंधक ५० ग्रॅम एकत्रून तीन दिवस घोटणी करावी, नंतर काचकुपीत भरून वालूका यंत्रात कुपी गळ्यापर्यंत पुरून २ दिवस अग्नि द्यावा. कुपीचे गळ्याजवळ रससिंदूर उडून लागलेला मिळतो. घोटणी करितांना हरणखुरी म्हणजे बहुफली किंवा चुंचलीची पाने मिसळून घोटल्यास गुणवृद्धि होते.

कुचलाबीज शुद्धी– कुचला विया तुपांत खरपूस तळाव्यात म्हणजे त्या औषधयोग्य शुद्ध होतात. कुटून पूड करून ठेवावी. इंद्रजव थोडे भाजून घ्यावें व मग पूड करून औषधांत घालावे.

प्रवाळ पिष्टी– प्रवाळाच्या कांड्या काळ्या टाकळीच्या पानांच्या रसांत किंवा शेवरीचे पानांचे रसांत १ दिवस भिजत ठेऊन दुसरे दिवशीं त्यांतच ठेऊन १ तासभर उकळून धुवून घेऊन खलांत घोटून पूड करावी, आणि गुलाब पाण्यासह रोज घोटणी याप्रमाणें २१ दिवस खल करावा. उत्तम पिष्टी होते.

प्रवाळ कांड्या नसल्यास प्रवाळ गड्डे मिळतात ते घेऊन पाण्यासह तासभर उकळून कुटून घोटून वरीलप्रमाणें पूड गुलाब पाण्यांत घोटून पिष्टी बनवावी. ७ दिवस घोटले तरी चालते.

गोदंतीभस्म– १½ किलो ओल्याचुन्यात ¼ किलो तुरटी पूड मिळवून, त्या मिश्रणाचा लेप १ किलो गोदंतीच्या तुकड्याना द्यावा; आणि १५–२० गोवऱ्या ठेऊन अग्नि देवून चुना तुरटी विरहित गोदंती पांढरे शुभ्र भस्म झालेली पूड करून ठेवून द्यावी. मात्रा २ ते ८ गुंजा पाणी, दूध, ताक इत्यादितून द्यावा. ज्वर, दाह, पित्त विकार, घेरी, श्वेत प्रदर, मूत्र कृच्छ्र, रक्त प्रदर, मुलांचे कास, अतिसार, कृशता आदि विकारावर. दंत मंजनानें दंत विकार जातात.

शृंग्यादि चूर्ण– लांबट कांकड शिंगी, अतिविष, नागरमोथा १।१ भाग. मिश्रण खडीसाखर ३ भाग मिळवून ठेवणे. मात्रा ४ ते ८ गुंजा लहान मुलांना, मोठ्याना १ ते २ मासे ज्वरातिसारकासघ्न.

ग्राही गण– बाळबेल चूर्ण, धायटी फुले, भाजलेला इंद्रजव, भाजलेले जिरे, भाजलेले धने, खसखसीच्या बोंडांचा घन, कुडासाल, कुडामूळसाल, लोध्र, भाजलेला आंबा कोयीतील मगज १।१ भाग एकत्र करणें. ४ ते ८ गुंजा. अतिसार, संग्रहणी, आमांशनाशक.

आनन्द भैरव– हिंगूळ २० ग्रॅम, प्रतिविषा (बिकमा) १० ग्रॅम, पिंपळी २० ग्रॅम, मिरे पांढरे ४० ग्रॅम, अफू शुद्ध २½ ग्रॅम एकत्र करून आलेरस, नागवेल रस व लिंबूरस यांच्या प्रत्येकी रसांत ३।३ वेळ खल करून गोळचा ज्वारी एवढया कराव्यात. दिवसांतून ३ वेळ पाण्याशी दिल्याने सर्व प्रकारचे अतिसार, आमांश–प्रवाहिका, विषूचिका, संग्रहणी आदि नष्ट होतात.

आंवळ्याचा मुरांबा किंवा अवलेह–आंवळे आख्खेच टाकावयाचे असल्यास त्यांना वेळूचे टोंचणीने टोंचवून वाफलून घ्यावेत आणि चौपट साखरेच्या पाकांत सोडून ठेवून द्यावेत.

अवलेह करावयाचा तर वाफलून मावा काढावा. तो तुपांत तळावा व त्याच्या चौपट साखरेच्या पाकांत सोडून ठेवून द्यावे.

बडीशेप, वाळंतशेपेचा उर्ध्वपातित अर्क–अर्कपात्रांत दहापट पाण्यांत रात्री भरून पहाटे अर्क काढण्यास सुरुवात करावी. निम्मा अर्क निघाल्यावर बंद करावे. मात्रा १ ते २ तोळे प्यावयास दिल्यानें दाह, तृषा, वांति, घेरी, हिक्का, अपचन, आध्मान–पोटफुगी, विदग्धाजीर्ण नष्ट होते. पोटदुखी, संग्रहणी, मुखपाक जातो.

प्रवाळ पंचामृत– प्रवाळ पिष्टी २० ग्रॅम, शंखपिष्टी १० ग्रॅम, शुक्ति पिष्टी १० ग्रॅम, कवड्यांची पूड १० ग्रॅम, कुक्कुटाण्ड-कवच भस्म १० ग्रॅम एकत्रून रुईदूध किंवा रुईमूळ त्वचारस किंवा रुईफुलांचा अथवा रुई पानांचा रस यापैकी कोणत्याही एकासह घोटून वडी बांधावी; सुकल्यावर झांकणी जोडांत बंद करून अग्नि-पुट द्यावे. पांढरे भस्म होते. प्रमाण १ ते २ गुंजा तूप, मधाशी द्यावें संग्रहणी, राजयक्ष्मा, श्वास, कास, हृद्रोग, परिणाम शूळघ्न.

विश्वाग्नि गुडा– गोवऱ्यांच्या निखाऱ्यावर सुंठ २ भाग, बिब्याचे तुकडे १ भाग भाजून घेऊन त्यांत ३ भाग गूळ मिळवून घोटावे. काळे मिश्रण झालेले बोरबी समान गोळ्या बांधून ठेवणे. दिवसांतून ३ वेळ पाण्यासह दिल्याने शूळ मदात्यय, वांति, विरेक आदि रोग नष्ट होतात. विषूचिका जाते.

दीपकपाचक चूर्ण– मीठ, हळद, सुंठ, साखर, हिंग, पादेलोण ओवा १।१ भाग एकत्र करणें. ४ ते १२ गुंजा अग्निमांद्य, अजीर्ण, पोटफुगी, शूळ, मलावरोध, मूत्र कोंडणे इत्यादि नाशक.

नारिकेल लवण– एक मोठा नारळ सोलून शेंडीही काढून टाकावी; आणि तो असा फोडावा कीं त्याचे एक शकल लहानसेंच व्हावे; आणि पाणीही सांडू नये. नंतर त्यांत मावेल तेवढे सेंधेलोण चूर्ण भरावे. नंतर तें शकल जागचे जागी बरोबर बसवून त्यावर मातकापड द्यावे; आणि ५ किलो वजन गोवऱ्यांचा अग्नि द्यावा. नंतर वरील मातकापड व कवच जळालेले हळूच बाजूस करून आंतील गोळ्याची पूड करून ठेवावी. मात्रा ४ ते ८ गुंजा दिवसांतून २ वेळ द्यावी. परिणामशूळ आम्लपित्त, वृक्कशूळ, त्रिदोष, गुल्म, सशूल नष्ट होतात.

वेदनाशामक मिश्रण– शुद्ध गांजाकळीचे चूर्ण, खुरासानी ओवा प्रत्येकी १० ग्रॅम, शुद्ध अफू, सूची (बेलाडोना) ची पाने प्रत्येकी २ ग्रॅम एकत्र करणें. मात्रा १ गुंज, नानातऱ्हेच्या शूळ वेदनाना कळा, चमका, दुखी याने बंद होतात. अनुपान-आलेरस, मध, दूध, पाणी अगर योग्य अनुपान.

देशी गुलाब अत्तर–कनोज येथें मिळतें.

तिक्तघृत– अष्टांगहृदय चिकित्सास्थान अ. १९ श्लो. २ ते ७–८ ते १० पहा.

रत्नवैक्रान्त (तुरभलीरत्नखडा) भस्म–तापवून लाल केलेले रत्न खडे घोड्याच्या, गाईच्या किंवा शेळीच्या मूत्रात २१ वेळ विझवून मूत्रासह अग्नीवर ठेऊन मूत्र आटवावे; आणि त्रिधारी किंवा गोल निवडूंग दूधात घोटून वडी बांधावीं. ती वडी झांकणी जोडांत उतरंडीचे (उत्तरवारुणी) पानांच्या लुगदीमध्यें ठेऊन मुद्रून गजपुट द्यावे; काढून खलून केळकंद रसासह अग्निवर रस आटेतों कोरडे करून केळकंद रसानेच वडी बांधावी. तीं वडी वरीलप्रमाणेंच उतरणीचे लुगदीत झांकणी जोडात बंद करून गजपुट द्यावें. शेवटी उतरणीचेंच चिकांत वडी बांधून उतरणीचेच लुगदीत ठेऊन मुद्रून गजपुट द्यावे. भस्म होते. त्रिदोषघ्न, राजयक्ष्मा, अर्बुदे, कातडीचे रोग, सर्व ज्वर, पांडू, मेह, श्वास, कास, शोथ, उदर नाशक आहे. हिऱ्याच्या भस्मा-ऐवजी वापरता येते. मात्रा $\frac{१}{३०}$ ते $\frac{१}{१५}$ गुंज.

विषमोगरी कंद–बडद्याचा कांदा, रानमिरची गड्डा, इसमाल गड्डा, कडबी नाहीचा कंद, राकस गड्डा, गरजफळ, कोरेलो कॉपॅस एपिजिआ नांवानें ओळखला जाणारा कंद. नैसर्गिक वर्ग–काकडी-कुकुर्बिटेसीई.

चिंचा सोरकयोग– पिकलेली व काळी पडलेली जुनी चिंच आणि सोरमीठ १।१ भाग बोळक्यात भरून, मामूली मातकापड देऊन २०० ग्रॅम मिश्रणास २०–२५ गोवऱ्यांचा अग्नि द्यावा. खलून ठेवावे. मात्रा– २ ते ४ गुंजा. मलमूत्रावरोध, पोटफुगी, पोटदुखी व कृमिघ्न.

फेनी खर्जूरवटी– बीरहित खारकेंत ८ गुंज अफू + २४ गुंजा जायफळ चूर्ण भरून पुटपाक करावा. मात्रा ½ ते १ गुंज. ग्राही, अतिसारघ्न वाजीकर, ग्रहणीनाशक. आनंद भैरवाप्रमाणें.

कृमीमुक्ति योग– वावडिंगाचे तांदूळ, बावची बी, कुटकी, बिवा, लसूण १।१ भाग, चिंचेचा कोळ २ भाग, मुक्तवर्षी (कुप्पीं) च्या रसांत घोटून गुंज प्रमाण गोळ्या. नानाप्रकारचे कृमि पातनार्थ व तद्भव शूळ, आक्षेपक यावर पाण्यासह दिवसांतून ३ वेळ द्याव्यात.

सुरसादिगण–सुश्रुतोक्त–काळी व पांढरी तुळस, फांगळा, अजवला–मालीतुळस, सूर्यगवत, मरवा, रानतुळस, महावीरा, कासविंदा, क्षवक-नकछिकणी, पांच–पानडी, वावडिंग, कायफळसाल, ग्रीष्मसुंदर, निर्गुडी, गोरखमुंडी, उंदिरकानी, फांजीचा वेल (वर्धारा), नीरपिप्पली, कामोणी, लिंबारा या २१ औषधांचा हा गण कफघ्न, कृमिनाशक, पडसे–जुनाट पडसे घालवणारा, अरुचिनाशक, खोकला, दमधापनाशक असून जखमा शुद्ध करणारा आहे.

रिंगणीचा घन– रिंगणीचा $\frac{1}{16}$ काढा करून त्यांत रिंगणीमूळ व फळांचें चूर्ण $\frac{1}{4}$ मिळवावे; घोटून वाळवून ठेवावे.

अर्जुनसालीचा घन– अर्जुनसालीचा $\frac{1}{16}$ काढा करून त्यांत अर्जुनसालीची पूड $\frac{1}{4}$ मिळवावी.

पुनर्नवा– चार प्रकारचा आढळतो. १ मोठे आंगठयाएवढे व गाभेदार पिठूळ मूळ असलेली आणि खूब पसरणारी. २ काष्टमय मूळाची व मूळात चक्राकार असलेली. हीच बाजारांत मिळते. ही मध्यम प्रमाणांत पसरते. ३ वीतभर पसरणारी पिठूळ गाभेदार मूळ असलेली गोडुस चवीची. ४ काष्ट पुनर्नवेप्रमाणें पसरणारी, पण पाने मात्र लघु पुनर्नवेप्रमाणेंच लांबट पण थोडी मोठी पानें असलेली व मूळ लहान असलेलीं. उपयुक्ततेच्या दृष्टीनें लघु पिष्टमय मूळांची व मोठीं पिष्टमय मूळांची या दोन्ही उत्तम आहेत. काष्ट पुनर्नवा कुटताना नाकाची आग होते. पण या दोहोनी होत नाही. चौथीत रसायन गुण दिसत नाही.

पुनर्नवा व वसू वेगवेगळ्या आहेत.

रत्नगिरी लोह २०० ग्रॅम लोह भस्मात प्रत्येक वेळी $\frac{१}{२०}$ शंखोपलादि मिश्रण मिळवित कोरफड रसासह घोटून वडी बांधून कापडमाती देऊन ५ किलो वजन गोवरींचा अग्नि २० वेळ द्यावा; व शेवटी इंद्रगोप (मखमली किडे) कीट चूर्ण २०० ग्रॅम मिळवून घोटून कढईत अग्नि देऊन कीट चूर्ण निःशेष जळून जाईतों अग्नि द्यावा. वाटलीत ठेवावे. मात्रा $\frac{१}{१०}$ ते $\frac{१}{५}$ गुंज तूप, साय, साखर दूध, मध आदींतूत १ वेळच रोज द्यावे. नपूंसकत्व, क्षय, वार्धक्यातील कमरशूळादिनाना विकार, पांडू, दमधाप आदि सर्व रोगघ्न व शक्तीदायक.

शंखोपलादि मिश्रण– सोमल ५० ग्रॅम, हरताळ ५० ग्रॅम, पारा ५० ग्रॅम, गंधक ५० ग्रॅम, भीमसेनी कापूर १० ग्रॅम एकत्र करणें. या मिश्रणाने सुवर्णादि लोखंडापर्यंत सर्व धातू तद्वत सर्व रत्ने, उपरत्ने, पाषाणादींचे भस्म करता येते. कृति रत्नगिरीप्रमाणें किंवा लोह वैक्रान्ताचे भस्माप्रमाणें तारतम्याने जाणावी.

लोहसव्वीर किंवा अयवीर सिन्दूर– पोलाद कीस १ भाग + सव्वीर १ भाग कोंवडीच्या अंडा सफेदीसह घोटून ६ तास क्रमाग्नि दिल्याने भस्म होते. कोंवडी अंडा सफेदी अभावीं कोरफड बलक घ्यावा. मात्रा $\frac{१}{१०}$ ते $\frac{१}{५}$ गुंज. सर्व रोगघ्न.

कासीस भस्म– हिराकस २०० ग्रॅम, सोरमींठ १०० ग्रॅम एकत्र तापवावे. मिश्रण द्रवरुप होऊन शिजून कोरडे झाल्यावर २–४ वेळ पाण्याने धुवावे. तांबड्या रंगाचे होते. त्यांत त्रिफळा काढा $\frac{१}{८}$ शेष केलेला चौपट घालून तो जळून भस्म कोरडे झाले कीं बाटलीत ठेवावें. $\frac{1}{4}$ ते $\frac{1}{2}$ गुंज पांडू, कामला आदिनाशक, रक्तवर्धक.

मंडूर भस्म - जुनें लोहकीट चूर्ण, त्रिफळा $\frac{१}{८}$ शेष काढा व गोमूत्र एका पाठोपाठ घालून अग्नीने कोरडे करावे. याप्रमाणें ८–१० वेळ करून त्रिफळा काढा + गोमूत्र एकत्रून ७ दिवस घोटून वड्या बांधाव्यात व गजपुट द्यावे. याप्रमाणें ३ गजपुटे दिल्याने उत्कृष्ट मंडूर भस्म होते. गुण-लोह भस्माप्रमाणेच. मात्रा १ ते २ गुंजा, दुसरा प्रकार– लोहकीट चूर्ण बकऱ्याच्या रक्तासह कालवून पातळसर करून वरणीत भरून जमिनीत पुरून ठेवावे. भूधर पुटाचे आंतील खड्डयांत पुरून वरील खड्डयात १०–२० गोवरींचा अग्नि दिवसांतून २–३ वेळ याप्रमाणें १० दिवस देऊन काढावे. पुनः बकऱ्याचे रक्त घालून पुरावे. याप्रमाणें ३ ते ७ वेळ केल्यानें फार उत्कृष्ट मंडूर भस्म होते. असाच विधि लोह–पोलाद–क़ांत पाषाणादीना केल्यास ती ती भस्मे फारच अप्रतिम गुणधर्मांची होतात.

खर्जुरादि चूर्ण– खारीक, पिंपळी, काळ्या मनुका, सुरवारी हिरडा, काकडसिंगी, धमासा १।१ भाग घ्यावे. प्रथम खारीक व

काळ्यामनुका शिवाय बाकीची चूर्णे एकत्रून एकेक मनुका व खारकेचा एकेक तुकडा टाकीत घोटावे अगर कुटावे. या प्रमाणें दोन्ही जिनसा संपवून घोटून कुटून एकजीव करून ठेवावे. हे तूप १ चमचा व मध २ चमचे एकत्र करून त्यासह अगर साध्या पाण्यासह घेतल्याने खोकला, दमधाप, पार्श्वशूळ नष्ट होतो. घसा चांगला होतो व क्षयरोग हटतो. प्रमाण १ ते २ मासे हे चरक चि. अ-८ मध्ये श्लोक १०० मध्ये सांगितलेले आहे.

**विमलमालतीवसंत**– विमलमाक्षिकभस्म १० ग्रॅम, चापट शिंपाची पिष्टी २० ग्रॅम, हिंगूळ किंवा रससिंदूर ३० ग्रॅम, पांढरी मिरी ४० ग्रॅम, जस्ताचे भस्म ८० ग्रॅम, लोणी २० ग्रॅम एकत्रून ३ दिवस कोरडा खल करावा; नंतर लिंबू रस घालीत खल ७ वेळ केल्याने लोण्याचा ओशटपणा जातो. कांड्या करून सुकवून ठेवाव्यात. मात्रा ½ ते २ गुंजा दूध, मध, साय, तूप, साखर आदि मधून दिवसांतून ३ वेळ दिल्यानें क्षय, जीर्णज्वर, अशक्तता, पांडु, कामला, रक्तप्रदर, श्वेतप्रदर, मंदाग्नि आदि अनेकच काय पण सर्वच रोगावर उत्तम आहे.

**विमलमाक्षिक भस्म**– पिवळे चौकोनी रवे असलेले ते विमल माक्षिक होय. त्याचे भस्म सुवर्णमाक्षिक भस्मकृतीप्रमाणें जाणावे.

**चापट शिंपांची पिष्टी**– समुद्रात चपट्या गोलट शिंपा मिळतात. अगदी रुपयाप्रमाणें सपाट असतात. त्या खलांत गुलाबपाण्यासह सात वेळ घोटाव्यात, म्हणजे पिष्टी तयार झाली.

**जस्ताचे भस्म**– कढईत जस्त पातळ करून त्यांत ¼ पारा सोडावा; नंतर कडुनिंब काष्टाने घोटीत बाभूळ सालीची भरड किंवा त्रिपत्री भरड टाकीत पूड करून घ्यावी. नंतर बाभळीचे

सालीचे $\frac{1}{16}$ काढ्यासह किंवा त्रिपत्रीचे काढ्यासह घोटून वडी बांधावी. झांकणी संपुटांत बंद करून वेताचे अग्निपुट द्यावे. याप्रमाणें पुनः पुनः खलीत ३ ते ७ पुटे दिल्यानें भस्म औषध योग्य होते; किंवा जस्त पातळ करून त्याचे $\frac{1}{4}$ आघाडाक्षार नाहीतर क्षारद्वय समान घेऊन केलेल्या मिश्रणांतून जस्ताचे $\frac{1}{4}$ मिश्रण त्या पातळ केलेल्या जस्तावर टाकून पळीनें घोटताच लागलीच चूर्ण होते. मग भांग पत्ती किंवा खसखशीची बोंडे $\frac{1}{16}$ काढा करून उरलेला चोथा त्या भस्मावर टाकून अग्नि देत घोटीत जळून गेल्यावर, त्या काढ्यांत घोटून बडी वांधावी आणि १०० ग्रॅम जस्त असेल तर एक किलो वजन गोवरीचा अग्नि पणतीजोडांत ठेऊन द्यावा. याप्रमाणें खल व अग्निपुटे ३ ते ७ दिल्याने रंगदार पिवळे भस्म होते. मात्रा $\frac{1}{4}$ ते १ गुंज तूप, दूध, मलई, साखर, मध ग्लूको अदि एकामधून द्यावें. ज्वर, जीर्णज्वर, क्षय, श्वेतप्रदर, अतिस्वेद, अपस्मार, मेंदूची विकृति, योषापस्मार आदि अनेक रोगघ्न.

दिव्य कामदुधा- कुक्कुटाण्डत्वक्‌भस्म, अजास्थिभस्म, चांदमाती (संगजीरा), व्योमाश्म भस्म ( संगेयशपभस्म ), सरिद्गोदंती भस्म, गुळवेलसत्व अभावी तांदूळ पिठ्ठी, काव १।१ भाग एकत्र ३ दिवस घोटून बाटलीत ठेवणें. मात्रा १ ते ४ गुंजा. दूध, मध, तूप, साखर आदींतून द्यावे. रक्तस्त्राव होणाऱ्या व्याधी— रक्तार्श, रक्तप्रदर, तोंडावाटे रक्त येणें. जठरान्तर्गत विकृति, रक्तपित्त, रक्तातिसार, अम्लपित्त, सोमरोग, क्षय, उरःक्षत, घेरी, मस्तकशूळ, मूत्रविकार, मेंदूची अशक्तता, गर्भिणीचे रोग, श्वेतप्रदर, हृदयाची घबराट, दाह, उन्माद, अपस्मार, कास, श्वास, मुखपाक, अर्शरोगातील उपद्रव, डांग्याकास, मूर्च्छा, अर्धांगवाताचे औषधी चिकित्सेत सहाय्यक, पित्तविकार, कोणत्याही रोगानंतर

येणारी अशक्तता, बालशोष, मंदाग्नि व उष्णतेचे विकार उष्ण व कडु अशा तीक्ष्ण औषधी योगाने ! किंवा त्यांच्या निरंतर सेवनाने होणारे अनेक उपद्रव याने नष्ट होतात.

कुक्कुटाण्डत्वक् भस्म- कोंबडीच्या अंड्यांची टरफले मीठाचे पाण्यांत उकळून घुसळून किंवा हातानें घासून त्यामधील पातळ काचोळी सोडवून पाण्याने धुवावे. नंतर उन्हात नाहीतर अग्नीवर वाळवून घ्यावें; नंतर रुचकीचे दूध किंवा तिच्या पानांचा, फुलांचा वा मुळीवरील सालीचा रस नाहीतर कोरफडीचा रस यापैकी एकासह घोटून घोटून तीनदा वाळवून वड्या बांधून १ किलो वजनाला सुमारे २० किलो वजन गोवऱ्यांचा अग्नि संपुट वद्ध करून ३ वेळ दिल्याने पांढरे भस्म होते. गुणधर्म मोती भस्माप्रमाणें.

अजास्थि भस्म- शृंगभस्माप्रमाणें कृति, मात्रा गुणादि तद्वतच.

व्योमाश्म- इंग्रजीत 'जेड' म्हणतात. हा तापवून २१ वेळ गुलाब पाण्यांत विझवावा म्हणजे त्याचें चूर्ण करता ; येते. नंतर गोबंधिनीचे रसासह घोटून घोटून तीनदा वाळवावे. हिचाच्या लुगदीत ठेऊन ३ गजपुटें द्यावीत. भस्म होते. मात्रा २ ते ६ गुंजा. मेंदू, हृदयाचे रोग, आक्षेप, शिरःशूल, हृदयविस्तार होणें, स्त्रियोन्माद, प्रतिश्याय, पीनसनाशक, स्मरणवर्धक इत्यादि गुणधर्म यांत आहेत.

गोबंधिनी- गावजबान-यतनालगी २ जाती. एक रानटी व दुसरी बागेतील. बाजारांत बागेत येणारीच मिळते. युनानी हकीम फार वापरतात.

सरिद् गोदंती भस्म नदीपात्रांत निमुळत्या गारगोटचा-पांढऱ्या रंगाच्या मिळतात. त्या निखाऱ्यावर भाजल्या जातात. कोठे कोठे यांना भाजून रांगोळचा घालण्यास वापरतात. भाजून पीठ करावे. कोरफड रसासह घोटून वडचा बांधून अग्निपुट द्यावे. वापरावे. कोणी यांना गांगोपल असेही म्हणतात. मात्रा २ ते ८ गुंजा. श्वेतप्रदरघ्न वंशलोचनाचे अभावी हे भस्म चालते.

गुळवेलसत्व– गुळवेलीच्या जाड म्हणजे पायाच्या अंगठ्या-एवढचा किंवा मणगटाएवढचा जाड ताण्यामध्ये भरपूर सत्व निघते. असे ताणे मिळाल्यास पाटचावर वरवंटचानें चेंचून पुष्कळ पाण्यात भिजत टाकावेत. वरचेवर ढवळणे कुस्करणें चालूच ठेवावे. तीन दिवसानंतर गाळून निवळत ठेवावे. तळाला पांढरें पीठ जमते, ते वेगळे काढून सुकवावे. ते कडसर पाणी फेंकून न देता ते आटवून त्याचा घन करून ठेवावा. पांढरे पीठ म्हणजेच सत्त्व होय. हें सत्व शीतवीर्य, जीर्णज्वर, प्लीहावृद्धी नाशक पित्तशामक, दाहतृषाहर, पाण्डु, अर्श, हिक्का, क्षय, प्रदर, श्वेत प्रदरादि, प्रमेह, अरुचि, श्वास आदि अनेक रोगघ्न. गुळवेल सत्त्वाभावी **तांदुळाची पिठ्ठी** घ्यावी. **त्याची कृति–** तांदुळ भिजवून फडक्यांत बांधून तासभर ठेवून मग उन्हांत पसरून ठेवावे. नंतर भाजून कुटावे. चाळून बाटलीत ठेवावे. हीच पिठ्ठी ही. लहान मुलाना शक्तीवर्धक तृप्तिकर, आजाऱ्यानाही हितकर आहे. ती कढवून दूध साखर घालून दिल्यानें वजन वाढते. प्रमाण पचेल तसे, पेजेकरिता ½ ते ४ तोळे आणि पिठ्ठी चूर्ण रूपांत ४ ते १२ गुंजा लहानास, मोठचास तीन माशापर्यंत. नाचणी, मका यांच्यापासूनही तसेच ज्वारीपासून पिठ्ठी काढता येते. गव्हाची पिठ्ठी– मैदाही म्हण-तात तो या पिठ्ठीचे मानानें पचनास जड आहे. तो पिठ्ठी अभावी घेऊ नये. ज्वरादिकांत तो चालत नाही.

**सितोपलादि चूर्ण**– खडीसाखर अथवा डेक्स्ट्रोज साखर (रक्तशर्करा) १६० ग्रॅम, वंशलोचन अथवा सरित् गोदंती भस्म ८० ग्रॅम, पिंपळी ४० ग्रॅम, वेलची २० ग्रॅम, दालचिनी १० ग्रॅम एकत्र करणें. मात्रा ४ ते ८ गुंजा दूध, तूप, साखर, मध इत्यादि मिळवून घेणें. कास, श्वास, क्षय, जीर्णज्वर, मांद्य, गळाठा, घेरी, दाह इत्यादि नाशक.

**मृतसंजीवनी सुरा**– भैषज्य रत्नावली पहा. वाजीकरणाधिकार.

**कासक्लेशघ्न चूर्ण**– सुंठ, पिंपळमूळ (गठिया), पिंपळी, बेहडा, उपलेट, ज्येष्ठमध. १।१ भाग एकत्र करणें. कास श्वासघ्न मात्रा ४ ते ८ गुंजा.

**वासावलेह्**– अडुळसपानें ५ भाग, बेहडा, कायफळ, धमासा, रिंगणी, तरवड मूळसाल १।१ भाग; यांत यांचे १६ पट पाणी घालून $\frac{1}{8}$ काढा करावा. त्यात दुप्पट साखर व समान भाग मध आणि ज्येष्ठमधाचा द्रवघन $\frac{1}{8}$ घालून ठेवून द्यावे. कास, श्वास, पडसे, डांग्याकास आदि कफ रोगावर १ ते २ चमचे चाटण दिवसातून ३–४ वेळ द्यावें.

**चिंतामणी चूर्ण**– खडकीरास्ना पाने, बळबीज, पद्मकाष्ठ, देवदार, वावडिंग १०–१० ग्रॅम; त्रिफळा ३० ग्रॅम, त्रिकटू ३० ग्रॅम एकत्र करणें. कास, श्वासघ्न. मात्रा ४ ते ८ गुंजा मधातुपासह.

**अष्टांग चूर्ण**– कायफळसाल, काकडसिंगी, उपलेट, धमासा, बाफळी १०–१० ग्रॅम; त्रिकटू ३० ग्रॅम एकत्र करणें. ज्येष्ठमध खडीसाखर, मध, आलेरस आदि एका बरोबर. कासश्वास, पडसें, मेदोरोग श्वेतप्रदर आदि रोगघ्न ४ ते ८ गुंजा.

शशांक योग- शीलाजतु शुष्क, वावडिंग, लोहभस्म, सुरवारी हिरडा, रससिंदूर, माक्षिकभस्म १०-१० ग्रॅम एकत्र करणें. २ ते ४ गुंजा तूप १ चमचा मध २ चमचे एकत्र करून सकाळ संध्या-काळ घेतल्यानें शक्तिवर्धक, कास, श्वासघ्न, पांडू, क्षय, कावीळ आदि अनेक रोगघ्न.

वकुळपाक- वकुळ फुलांचा काढा १/८ त्यांत सरवताप्रमाणें होईल इतकी साखर घालून पाक करणें. डांग्याकास घालवण्याकरितां दिवसांतून ६ वेळ १।१ चमचा.

महावातविध्वंस समगंधकज्जली २० ग्रॅम, नागभस्म, वंगभस्म लोहभस्म, माक्षिकभस्म, ताम्रभस्म, अभ्रकभस्म १०-१० ग्रॅम त्रिकटु ३० ग्रॅम, बचनाग ४५ ग्रॅम, गांजा १० ग्रॅम, टाकणखारलाही १० ग्रॅम एकत्रून तीन तास घोटणें. नंतर त्या मिश्रणास त्रिकटु. त्रिफळा, चित्रक, पिवळेघोत्रामूळ सालीसह एकत्र केलेल्या १/८-काढ्याच्या ३ भावना द्याव्यात; नंतर उंची कोष्ठ (उपलेट) व अक्कलखारा यांच्या एकत्र हिमाच्या ३ भावना द्याव्या; नंतर त्रिपत्री रसाच्या ३ भावना. धोतरापर्ण रसाच्या, पिवळा धोतरापर्ण रसाच्या, अडुळसापर्ण रसाच्या, जोंधळी रसाच्या, रुई दुधाच्या अथवा रुईमूळ सालीच्या रसाच्या नाहीतर रुईपर्ण रसाच्या आणि शेवटी कागदी लिंबू रसाच्या ३।३ भावना देऊन झाल्यावर कांड्या किंवा १।१ गुंजेच्या गोळ्या बांधून सुकल्यावर बाटलीत भरून ठेवावे. अनुपान परत्वे सर्व वातविकारादि रोगावर (योगरत्नाकर पाहा) द्यावा.

नागभस्म- शिसें लोखंडी पात्रांत पातळ करून त्यावर तत्सम रसभस्म टाकून पळीने लागलीच घोटावे. पांच मिनिटांत ताम्बडे नागभस्म तयार होते. निरुत्थीकरणार्थ त्या भस्मात त्याचे

$\frac{१}{१०}$ मनशील मिळवून कुक्कुटाण्ड सफेदीसह घोटून वडी बांधून सुकल्यावर पणती जोडांत मुद्रून कपोतपुट द्यावे. याप्रमाणें प्रत्येक वेळी $\frac{१}{१०}$ मनशील मिळवीत व सफेदीसह घोटणी करीत १० कपोत पुटे द्यावीत. औषधयोग्य भस्म होते. मात्रा $\frac{१}{२०}$ ते $\frac{१}{१०}$ गुंज साय, तूप, लोणी, मध, साखर इत्यादि वगैरे एकासह द्यावे. गुणधर्म–अहिवंग भस्माप्रमाणें. रसभस्म पुढे लिहिले. आहे.

वंगभस्म- एका कापडी पिशवीत १ किलो दुधीपंचांग चूर्ण भरावे. भरताना त्या चूर्णात २५ ग्रॅम कथीलाचे कागदाप्रमाणें पातळ केलेले पत्रे; अर्धा, पाव इंच लांबी रुंदीचे तुकडे करून मधून मधून भरावेत. पिशवीचे तोंड शिवून तीवर स्पिरिट ओतून पेटवून द्यावी. धुमसून धुमसून सहा तासानी जळून जाते. त्या राखेतून भस्मीभूत कथील वेचून घेऊन कोरफड रस किंवा हिरणखोरी अथवा चुंचली हिमासह घोटून वडी बांधून, सुकल्यावर कपोतपुट झांकणी जोडांत बंद करून द्यावे. याप्रमाणें तीन वेळा वडी बांधून पुटे दिल्याने पांढरे औषधयोग्य भस्म होते.

महावात विध्वंसांत नागभम, वंगभस्माऐवजी अहिवंगभस्म २० ग्रॅम, आणि माक्षिकभस्म, ताम्रभस्माऐवजी ताप्यहतताम्र २० ग्रॅम घेतले तर चालते.

त्रिपत्री–नाई पाने (मामेजवा), निर्गुडी पाने व माका पाने किंवा पंचांग समभाग एकत्र करणें.

जोंधळी म्हणजे भुई आवळी–ही दोन प्रकारची असते. एक मधुर रसाची व दुसरी तिक्त रसाची. महावात विध्वंसा-करितां मधुर रसाची हवी.

गांजा-विजया-कळ्या तुरे तूप लावून किंचित भाजावेत आणि दुधांत शिजवून दूध आटल्यावर घोटून औषधांत घालावे.

अभिनव वातविध्वंस–समगंधकज्जली २० ग्रॅम, नागभस्म १० ग्रॅम, वचनाग १० ग्रॅम, मिरे १० ग्रॅम, कोंबडनखी १० ग्रॅम एकत्रून निर्गुडीपर्णरस व एरंडपर्णरस यांत ३।३ दिवस घोटून १।१ गुंज गोळ्या करणे. अनुपानपरत्वे वातविकार, वातज्वर, आक्षेपक आदि रोगावर योजावें.

समीर गजकेसरि–रसर्सिदूर, अफू, कुचला, मिरे, शुद्ध गांजा-कळी, झुंदबिदस्तर १।१ भाग. नागवेलीच्या पर्णरसासह घोटून १।१ गुंजेच्या गोळ्या कराव्यात. सर्व वातविकार, निद्रानाश, नपूंसकत्व यांवर.

अफूशुद्धी–अफू आले रसासह घोटून वाळवावी. याप्रमाणें ३ वेळ घोटून बाटलीत भरून ठेवणें. ही औषध योग्य होते.

झुंदबिदस्तर-याच नांवाने बाजारांत काष्टौषधी दुकानी मिळतें. युनानी हकीम वापरतात. पाण्याच्याकडेस एक प्रकारची सशाची जात असते. जंगली लोक वेळूच्या खोलगट वाटी असलेल्या खुंट्या या वन्य जीवाच्या संचार स्थली रोवून ठेवतात. हा प्राणी आपले अंड त्या खुंटीला घासतो. त्यांतील द्रवमद त्या वेळूच्या वाटीत जमून उन्हानें सुकतो. तो काढून विक्रीस आणतात. हा कस्तूरीप्रमाणें वृष्य वाजीकर आहे.

बलोत्साही पेय–अनन्तमूळ, आस्कंध, मंजिष्ठा, सराठे कवचबीज, शतावरी, ज्येष्ठमध, वडपारंब्या, पळसफुले, चोपचीनी व वेलची १।१ भाग यांचें मिश्रण करून ठेवणे. १ कपभर उकळत्या पाण्यांत १ चमचा मिळवून चहाप्रमाणें थोडावेळ उकळून

आवडीप्रमाणें दूध साखर घालून चहाप्रमाणें गाळून प्यावें. या मिश्रणाचा घन तयार केला तरी चालतो. तो मग उकळत्या दुधांत $\frac{1}{4}$ ते $\frac{1}{2}$ चमचा मिळवून आवडीप्रमाणें साखर मिळवून प्यावा.

नागरसायन–नागभस्म (रसभस्ममारित) ४० ग्रॅम, विमलभस्म, माक्षिकभस्म, ताम्रभस्म, कांतपाषाणभस्म (किंवा चुंबक लोहभस्म), अभ्रक सत्त्वभस्म, स्फटिक भस्म १०- १० ग्रॅम एकत्रून त्रिफळाकाढयांत घोटीत वड्या बांधीत एकूण ३० लघुपुटे द्यावीत. नंतर या मिश्रणाचे समान वजन वावडिंगचूर्ण व तिप्पट त्रिकटुचूर्ण मिळवून बाटलीत भरून ठेवावें. १ ते ३ गुंजा चमचाभर तूप व दोन चमचे मधासह कालवून दिवसांतून ३ वेळ दिल्यानें सर्व (८० प्रकारचे) वातविकार, विशेषत्वानें धनुर्वात, कफरोग सर्वप्रकारचे मूत्रेंद्रियाचे रोग, क्षय, पांडू, शोथ, ग्रहणी, शीतज्वर, आमदोष, दूषित जलदोषज विकार नष्ट होतात.

रसभस्म- नायट्रिक ॲसिड (सोन्याचे कडक तेजाब) १०० ग्रॅम घेऊन त्यांत ३० ग्रॅम पारा सोडून तो विरल्यावर मंदाग्नीनें तामचीनी कटोरीत पक्व करावे. पांढरी पूड होते. तेच रसभस्म.

ताम्रभस्म–सोमनाथी प्रकार–समगंधकज्जली १०० ग्रॅम, ताम्रचूर्ण ५० ग्रॅम, हरताळ २५ ग्रॅम, मनशीळ १२$\frac{1}{2}$ ग्रॅम एकत्रून घोटून झांकणी जोडांत मुद्रून अगर काचकुपीत भरून वाळुकायंत्रांत ठेऊन २ प्रहर अग्नि द्यावा. (झाकणी जोडांत मुद्रून करणें तर अग्नि सुमारे १०० गोवरींचा द्यावा.) खलून ठेवावे. (गुणधर्म-रसेन्द्र चूडामणी, रसरत्न समुच्चय पहा).

ताम्रचूर्ण मिळविण्याचा प्रकार-२५० ग्रॅम मोरचूद चूर्ण एका एनॅमल भांड्यांत घेऊन त्यांत १० ग्रॅम सव्वीर मिळवावा.

आणि त्यांत पाव किलो गंधकाचे कडक तेजाब (सल्फ्युरिक अ‍ॅसिड) मिळवून उघडच्या हवेवर मंद विस्तवावर ठेवावे. अर्ध्या तासाने १२५ ग्रॅम तेजाब आणखी घालून काचेच्या काडीने हलवून तास दीड तास शिजत राहू द्यावे. तेजाब आटून चिखलाप्रमाणें घट्ट होत आलें, म्हणजे स्वच्छ बुडाच्या लोखंडी टोपल्यांत ३-४ तांबे पाणी घालून त्यांत तो पंक (चिखल) मिळवून ढवळून ५-७ तास पडून राहू द्यावे. पाटीच्या बुडाला आंतून काळसर तांबूस ताम्रचूर्ण लागलेले वेगळे करून काढून घ्यावे. याप्रमाणें जेवढे ताम्रचूर्ण निघेल तेवढे काढून २-४ वेळां पाण्याने धुवून बाटलीत भरून ठेवावे. हे सुमारे ७५ ग्रॅम मिळते. हे भस्माकरिता घ्यावे. ताप्यहत ताम्र तयार करण्यासाठीं हें घेतल्यास चालेल.

कांतपाषाण अगर कांतलोह (लोहचुंबक) भस्म लोहवैक्रांत भस्म रीतीप्रमाणें करावें.

अभ्रकसत्व— अभ्रकचूर्ण २ किलो, टंकण ½ किलो, झिंगे ¼ किलो, म्हशीचें शेण गोळे बांधण्यापुरते घेऊन, सर्व एकत्र करून एकजीव करून लाडू बांधावेत. उन्हांत चांगले खडखडीत सुकल्यावर ४० किलो गोवऱ्यामध्यें ठेऊन अग्नि द्यावा. अर्धा खड्डा गोवऱ्यानी भरल्यावर एक रुंद खापर त्यावर ठेऊन त्यावर हे लाडू ठेऊन मग बाकी गोवऱ्या भरून अग्नि द्यावा. सर्व जळून थंड झाल्यावर गोवऱ्यांची राख बाजूस करून लाडूंची तेवढी राख घेऊन एका मोठ्या मुषींत दाब दाबून भरावी; आणि ती मूस तीव्राग्नीने पक्व केली असतां राख जळून रस होतो. तो एका रुंद खापरावर मूस पालथी करून ओतावी. त्या रसाची एक ढेपच थंड झाल्यावर होते. उखळीत घालून ती ढेप कुटून चूर्ण करावी, आणि चांगला शक्तिमान लोहचुंबक त्या चूर्णावरून वारंवार फिरवून त्याला चिकटलेले

धातूकण वेगळे करून ठेवावेत. ते मग दुसऱ्या एका मुषींत घेऊन तीव्राग्नीने रस करून लगड पाडावी. हे सत्त्व दिसावयास काशा-प्रमाणें दिसतें. यांत लोखंडासह इतर बऱ्याच धातूंचे मिश्रण असते.

या अभ्रक सत्त्वाची लगड चिवट व घनवर्धनीय असल्यास तापवून ठोकून ऐरणीवर पसरट बनवीत पत्रे बनवावेत; अगर मशीनवर पातळ पत्रा बनवून आणावा. मग कातरून लहान लहान तुकडे करून लोहवैक्रांताचे विधीत सांगितलेल्या माक्षिकादिचूर्ण, त्रिफळा काढा व लिंबू रसात कालवून त्या पत्र्याच्या तुकड्यानाही त्यांत कालवून झांकणी संपुटांत बंद करून गजपुट द्यावे. याप्रमाणें प्रत्येक वेळी अभ्रक सत्त्वाचे $\frac{1}{4}$ माक्षिकादि चूर्ण घालीत चार अग्निपुटे झाल्यावर, केवळ त्रिफळा काढा व लिंबू रसासह घोटून वड्या बांधून बारा पुटे दिल्याने उत्तम भस्म बनते.

किंवा लगड पाडण्यापूर्वी लोहचुंवकानें वेंचलेल्या कणांचे $\frac{१}{१६}$ माक्षिकादिचूर्ण मिळवून लोहवैक्रांत विधीप्रमाणें १६ अग्निपुटे दिल्यानेही भस्म बनते. अग्नि मात्र या सत्त्वाला दणकून दिला पाहिजे. हें सत्त्व भस्म म्हणजे भारतीयानी जगाला दिलेली अमृतमय दिव्य देणगी आहे. या प्रबंधांत या सत्त्वासंबंधीचा प्रपंच अप्रस्तुत आहे. एवढेंच लिहितो कीं मूळ नैसर्गिक अभ्रक म्हणजेच एक जटिल संयुगमय दिव्य औषध आहे. यांत बारा पंधरा धातूंचे सहजासहजी वेगवेगळे न होणारे संमेलन आहे.

अभ्रकसत्व भस्म गुणधर्म– शीतवीर्य, मधुर रसाचे, स्निग्ध, रुचिकारक, केसाना हितकर, आयुष्यवर्धक, त्रिदोषनाशक, पूंस्त्व-शक्ति भरपूर वाढविणारे, वीर्यस्तंभक, बहुसंतति देणारे, आभा प्रभा देणारे व मुखमंडल तेजस्वी करणारे; उत्तम दीपनपाचन आणि रसायन गुणाचे आहे. मात्रा– $\frac{१}{१०}$ ते $\frac{1}{4}$ गुंज.

रसार्णवाचे ११ व्या पटलांत श्लोक ८० मध्यें अभ्रक सत्त्वाच्या भस्माचे अभावी- अभावेऽभ्रकसत्त्वस्य कान्तसत्त्वं प्रदापयेत् । कान्तस्याप्यभावे तु तीक्ष्णलोहन्तु दापयेत् ॥ कान्त पाषाणाचें सत्त्व किंवा तेंही उपलब्ध नसल्यास पोलाद (भस्म करून) वापरावयास सांगितले आहे.

मागे लिहिलेल्या रीतीप्रमाणें २ किलो काळचा वज्राभ्रकापासून सुमारे १०० ग्रॅम सत्त्व मिळते. ही रीत मी अनुभवानें बसविली आहे. काळजीपूर्वक कृति केल्यास याहूनही जास्त सत्त्व हाती येते.

षट्चरण योग- कोंवडनखीचे चूर्ण, अश्वगंधा (ढोरगुंजेची गाभेदार जातीची मुळी), भुईतर्वडाच्या मुळीचे चूर्ण, ईश्वरमूळ चूर्ण, चोपचीनीमूळ चूर्ण, उंटकटारी मूळावरील सालीचे चूर्ण १।१ भाग एकत्र करणें. मात्रा-४ ते १२ गुंजा. वालपक्षाघात, पक्षाघातादि अनेक वातविकारावर द्यावे.

स्फटिक भस्म- स्फटिक म्हणजे निमुळता, षट्कोण, धारदार काचेप्रमाणें स्वच्छ पारदर्शक, लोलकाकृति काचमण्याचा नैसर्गिक रवा आहे. हल्ली रस्त्यावर काच कापून दाखवून हे खडे अगदी अल्प किंमतीत विकावयास घेऊन कांही डोंगरी किंवा असेंच किरकोळ वस्तू विकणारे लोक बसलेले असतात. कारण ह्नि्याप्रमाणें या काचखडड्याने कांच कांपली जाते. यासच Rock Crystal किंवा रवेदार जलरहित गारगोटीं- Cristallised anhydrous Quartz म्हणतात. याने काचेवर रेघ ओढल्यास काच कापली जाते. हे जांभळे, तांबूस, पिवळे, हिरवट, पांढरे स्वच्छ किंवा इतरही तांबूस, गुलाबी आदि अनेक रंगांचे आढळतात. विषेशे-

करून पांढरे व जांभळटच जास्त आढळतात. पुणे, लोणावळा आदि भागातील डोंगरी आसमंतात मला हे पुष्कळ खडे आढळले आहेत.

हा स्फटिक मणि आणून उखळीत कांडून शक्य होईल तेवढें बारीक चूर्ण करून त्यांत त्याचे ¼ सव्वीर (दारचिकणा) मिळवून त्रिधारीचा चीक किंवा रस, केळकंदरस आणि उतरणीचे दूध किंवा रस यासह क्रमानें घोटून वडी बाधून झांकणी संपुट अथवा मूषासंपुटांत बंद करून कडक अग्नि द्यावा. तीन ते नऊ अग्नि पुटानें भस्म तयार होते. प्रत्येक वेळी पाव हिस्सा सव्वीर मात्र मिळवावा तसेंच या वनस्पतीही प्रत्येक वेळी घ्याव्यात.

गोधावसा– घोरपडीची चरबी ती मिळविण्याची पद्धति. घोरपडीचे चारी पाय बांधून तीस उताणे जमिनीवर ठेवावे, आणि तिच्या तोंडांत तम्बाखूची चिमट टाकावी. ती बेशुद्ध होते. ब्लेडच्या पत्तीने (दाढी करण्याचे ब्लेड) तिचे पोटावर मध्यभागी सरळ रेघ ओढावी म्हणजे वरील कातडी कापली जाऊन, तिच्या पोटामध्ये कापलेल्या चिरेच्या दोन्ही बाजूस आंत चरबीच्या वर्तिका असतात. त्या सोडवून एका स्टेनलेसच्या वाटीत घेऊन अग्नीने गरम केल्यास चरबी तैलरूपांत येते, ती बाटलीत भरून ठेवावी. उपयोगांत आणावी. या चरबीचे अनेक उपयोग आहेत.

गतिरोधहर– घनसर, निर्गुंडी, पुनर्नवा, अक्कलकारा, गजगा, पिंपळी, शिलाजतु, नवसागर, गुग्गुळ १।१ भाग नागदौण लुगदीसह घोटून गोळ्या २ ते ४ गुंजेच्या बांधणें. १ ते २ गोळ्या पाण्याबरोबर दिल्यानें नानाप्रकारचे शोथ, वात विकार, स्नायूंची गति रोखणे आदिवर उपयोगी.

षड्धरण चूर्ण– चित्रक मुळावरील साल, इंद्रजव (भाजून घेतलेले ( पहाडमूळ, कुटकी, अतिविष, सुरवारी हिरडा १।१ भाग मिश्र करणें. मेदकफावृत, नानाप्रकारच्या वात व्याधीवर हे उपयुक्त आहे. मात्रा ४ ते १२ गुंजा.

सूक्ष्म समीर सिंदूर, सूक्ष्म समीर पन्नग-दोहीपैकीं (कोणाचें-ही) १ गुंज + १०० गुंजा ग्लूको अथवा खडीसाखर किंवा तांदूळ पिठ्ठी घेऊन तासभर घोटून ठेवावे. दुग्धशर्कराही चालते. मात्रा १ गुंज. नानातऱ्हेचे वातकफज रोगांत वारंवार देण्याची जरूरी असता, या सूक्ष्म कल्पाचा उपयोग करता येतो.

समीर सिंदूर, समीर पन्नग– समगंधक कज्जली १२० ग्रॅम, पांढरा सोमल ६० ग्रॅम, मनशीळ, हरताळ ६०–६० ग्रॅम एकत्रून तुळशीच्या रसांत घोटून सुकल्यावर काचकुपीत भरून मातकापडे देऊन वालुका यंत्रात ३६ तास अग्नि दिल्याने, समीर सिंदूर कुपीचे गळचाजवळ आणि २४ तास अग्नि दिल्याने समीर पन्नग कुपीचे तळी मिळतो. समीर सिंदूर शेंदरी रंगाचा व समीर पन्नग काळा उज्ज्वल पण घासल्यावर पिवळा व वजनदार असतो. दोहोंचे गुण. कफस्त्रावी, वातघ्न, संधिशूळघ्न, गृधृसीहर. मात्रा $\frac{१}{१००}$ ते $\frac{१}{१०}$ गुंज.

लघुराजमृगांक (अनुपान द्रव्य) – तूप + मिरपूड + तुळ-शीपर्णरस.

प्राजक्तवटी–पारिजातकाच्या मूळाची वा वृक्षाची साल १० भाग, पिंपळमूळ १ भाग, पारिजातकाच्या पानांचा घन १ भाग, सहस्त्रवेधी भस्म १ भाग, गजगा बीज मज्जा १ भाग, मल्लभस्म $\frac{१}{२०}$ भाग एकत्रून अफू बोंडाचे $\frac{१}{८}$ काढ्यासह घोटून गोळी १ गुंजेची. दिव-सांतून ३ वेळां पाण्याबरोबर, गृध्रसी ज्वर, शीतज्वर, यकृत्, प्लीहा,

वृक्काचे विकारावर उपयोगी आहे. जरूरीप्रमाणें मल्लभस्म घालणे न घालणें याचा विवेक करावा.

वाजिवर्मा रस– ( अश्वकंचुकि, घोडाचोळी, कोडासुरी, अश्वानल, वडवानल इत्यादि नांवानें प्रचारात असलेला ) समगंध-कज्जली २० ग्रॅम, जरूरीप्रमाणें बचनाग अथवा निर्विषी १० ग्रॅम, टंकणलाही १० ग्रॅम, शुद्ध हरताळ १० ग्रॅम, त्रिकटु ३० ग्रॅम, त्रिफळा ३० ग्रॅम, जेपाळ बीजमगज १० ग्रॅम एकत्रून माकारसाच्या ७ वेळ घोटी भावना. १ गुंज गोळी नानातऱ्हेचे पोटाचे मलरोधज विकार, ज्वर आदि अनेक रोगघ्न.

पवनाशन योग– आस्कंध, कुचलाचूर्ण, कोंबडनखी, सुंठ १–१ भाग. नागवेलीच्या पान रसासह गोळी १ ते २ गुंजेची. तूप, साय, दूध, साखर आदिमधून दिल्याने संधिवेदना, कटिशूळ, पोटांत वात धरणें, मेंदूची अशक्तता, गुदमार्गातील मलापसरण क्रिया न होणें, गुदत्रिवळीचा स्तब्धपणा आदि अनेक विकार, ज्वर कासादि नष्ट होतात.

धात्रीघृत. चिंचातेल– आवळारस १ लिटर, तूप साजुक ¼ किलो, आवळाकल्क ५० ग्रॅम एकत्रून मंदाग्नीनें तूप उरवावे.

धात्री ऐवजी चिंचेचा कोळ व तुपा ऐवजी शेंगदाण्याचें गोडेतेल घेऊन केल्यास चिंचातेल होते. दोहोंचे गुणधर्म जवळ जवळ सारखेच. मळाच्या गाठी मऊ बनवून निस्सारणारे, आनुलोमी, शूळघ्न, आध्माननाशक.

हिंग्वादि एकोत्तर वृद्धिचूर्ण - हिराहिंग तांबूस १० ग्रॅम, जायफळ २० ग्रॅम, वावडिंग ३० ग्रॅम, सुंठ ४० ग्रॅम, ओवा ५० ग्रॅम, सुरवारी किंवा बाळहर्डा, एरंडेल भृष्ट ६० ग्रॅम, पिंपळी चुना लावून भृष्ट

७० ग्रॅम, उंची कोष्ठ ८० ग्रॅम, चित्रकमूळ साल ९० ग्रॅम एकत्रून ठेवणें. गुल्म, अजीर्ण, अग्निमांद्य, शूळ, मलावरोध आदि रोगघ्न. मात्रा ४ ते १२ गुंजा पाण्यासह दिवसांतून ३ वेळ.

वन्हिमुख योग– नवसागर पाणी दुप्पट घालून अग्नीवर पाणी आटवावे, पूड होते. तीत तेवढीच पिंपळी, तेवढाच सेंधेलोण घालून २ ते ४ गुंजा द्यावे. कारणपरत्वे पाहिजे तेव्हां बनवावे. एकदम बनवून ठेऊ नये. सारक, पोट शूळघ्न, पोटफुगी नाशक, आर्तवकर.

वज्रक्षारादि सारे योगरत्नाकर, भैषज्य रत्नावली ग्रंथांत पाठ आहेत. तेथें पाहावेत. त्रियोनि रस-रसराजलक्ष्मी मुकुन्दीटीकेत आहे.

प्रभाकर वटी– माक्षिकभस्म, लोहभस्म, अभ्रकभस्म, वंशलोचन, शिलाजतु १–१ भाग. अर्जुनसालीचे काढ्यासह घोटणी. मात्रा १ ते ४ गुंजा हृद्रोगघ्न.

महारास्नादिक्वाथ– शाङ्‌र्गधर संहितेतील पाठ.

दशमूलारिष्ट– शाङ्‌र्गधर संहिता पाहा.

सूक्ष्मकृत मल्लभस्म– २ गुंजा मल्लभस्म + १०० गुंजा तांदुळपिठ्ठी, किंवा खडीसाखर एकत्र घोटून ठेवणें. मात्रा १ गुंज मध, लोणी, साय, तूप, साखर आदि अनुपानाशी. घटसर्प, आमांश, परिणाम शूळ, कंठशालूक, त्वग्विकार, नाना शोथ, कफवात योगघ्न.

मल्लभस्म– एका मडक्यांत २ किलो शेराचे पिकलेल्या व गळून पडलेल्या सुकवलेल्या नांग्या जाळून केलेली पांढरी राख

निम्मी भरून त्यावर सोमलाचा २ ते ५ तोळे (२० ते ५० ग्रॅम) वजन खडा ठेऊन पुन्हा उरलेली राख भरावी. चुलीवर मडके ठेऊन ६ ते ८ तास अग्नि द्यावा. मडक्याच्या बुडाला अग्नि द्यावा. स्फुलिंगाच्या चांदण्या दिसू लागल्या म्हणजे 'मडके हसू लागले' असें म्हणतात; तेव्हां अग्नि देणे बंद करावे. थंड झाल्यावर सोमल फुगलेला असतो, तो निखाऱ्यावर ठेवून त्याला लागलेली राख जळू द्यावी. तो चांगला भस्मरूप झालेला असेल, तर निर्धुम व अग्निस्थायी झालेला असतो. मात्रा $\frac{१}{१००}$ ते $\frac{१}{५०}$ गुंज सूक्ष्म बनवून साय, तूप, मधादि अनुपानातून.

दुसरा प्रकार–एका मातीच्या झांकणीत $\frac{१}{२}$ किलो सर्जिका (सोडाबायकार्बं) भरावी–तीमध्ये सोमलाचा २० ग्रॅमचा खडा पुरावा. ही झाकणी कोळशांच्या निखाऱ्यावर ४ तास ठेवावी. नंतर अग्नि काढून ६–८ तास तशीच थंड होईतों राहू द्यावी. सोमल फुगून दुप्पट वजन होतो. गुणधर्म वरीलप्रमाणेंच–पण कमी प्रमाणांत.

सूक्ष्मकृत तालकभस्म–तालकभस्म १ गुंज + १०० गुंजा ग्लूको किंवा खडीसाखर एकत्र घोटणे. १ गुंज मात्रा तूप, साखर, मध आदितून द्यावे. हृदयरोग, कुष्टरोग, दमा, क्षय बरा होतो.

तालकभस्म रुईच्या दुधात अगर तिचे मुळीचे सालीचे रसासह किंवा रुईफुलांच्या रसासह अथवा पानांचे रसासह तेही मिळाले नाही तर, लिंबूरस अथवा कोरफड रसासह, नाही तर आलेरसासह हरताळ ७ ते २१ दिवस घोटून वडी बांधावी. सुकल्यावर ती बाहवा शेंगांच्या पांढऱ्या राखेत पुरावी. बाहवा शेंगांची पांढरी राख न मिळाल्यास तिच्याऐवजी आघाडा, पुनर्नवा, वसू, पिंपळ, चिंच, पळस, बाभूळ, कडुनिंब यापैकी एकाची जाळून केलेली पांढरी

राख चालते. एवढेच नाहीतर कोंबडीच्या रिकाम्या अंड्यांची टरफले जाळून केलेली पांढरी राख सुमुद्र फेसाचे चूर्ण, नदीतील किंवा समुद्रातील शिंपांचे पांढरें भस्म यापैकी जे मिळेल ते घेतले तरीं चालेल. ५ तोळे हरताळ वडीला बाहवा राख २ किलो हवी. मडक्याचे तोंड बंद करून मडक्याखाली अग्नि ३६ तास द्यावा. श्वेत भस्म होते. मात्रा $\frac{१}{१००}$ गुंज.

अहिफेनिय मल्लभस्म–अफू २० ग्रॅम, सागरगोटा बीजमज्जा ३० ग्रॅम, सोमल १० ग्रॅम. प्रथम अफू व सागर गोटामगजाची घोटून दामटी वळावी. ती सोमल खड्याभोंवती चिपकून द्यावी. झाकणी जोडांत बंद करून सात मातकापडे द्यावीत. १०–२० गोवऱ्यांचें अग्निपुट द्यावे. (१ किलो वजन गोवऱ्या) सोमलभस्म फुलून होते. मात्रा $\frac{१}{२४}$ गुंज वेदनाशामक, निद्रल, आमविषपाचक, हृदयबल्य, संधिवेदना हर.

दरदेश्वर- हिंगूळ धोत्र्याचे बी रहित ओल्या फळांच्या लुगदीत ठेऊन एक मातकापड द्यावे; आणि गोवऱ्यांचे लहानसे पुट असे द्यावे कीं, हिंगुळात धोत्रा बोंडातील रसाचा संस्कार व्हावा. असे सात वेळ केल्यानंतर तो हिंगूळ १ भाग + लवंग $\frac{1}{2}$ भाग एकत्रून नागवेल रसांत घोटून ठेवावे. मात्रा $\frac{1}{2}$ गुंज दूध, साय, मध, ग्लूको साखर आदि मधून द्यावी. उत्तेजक, हृदयास हितकर, कटिवातहर, पूंस्त्वकारक, पार्श्वशूळघ्न, कास, श्वास, ज्वरघ्न बाळंत रोग नाशक, मकरध्वजाचा प्रतिनिधी.

नागार्जुनी गुटिका- नागेश्वर १० ग्रॅम, अर्जुन सालीचा घन १० ग्रॅम, त्रिफळा ३० ग्रॅम, त्रिकटु ३० ग्रॅम, गंधवरा ३० ग्रॅम, काडेचिराईत, सर्पगंधा, कुचला, बचनाग १०–१० ग्रॅम एकत्रून

अडुळसा रसांत खलून १।१ गुंजेची गोळी बांधावी. हृदयवल्य, सान्निपातिक अवस्थेतील वातकफाचे सर्व रोग, अजीर्ण, अग्निमांद्य नाशक आहे.

नागेश्वर– हिंगूळ, शिसभस्म ८०।८० ग्रॅम, मनशीळ १० ग्रॅम, गंधक १७० ग्रॅम एकत्रून निंबुरसासह खलून वडी बांधावी. झांकणी संपुटांत मुद्रून २० किलो वजन गोवरींचा अग्नि द्यावा. अग्निपुट गजपुटाचे खड्यात द्यावे. मात्रा $\frac{1}{10}$ ते $\frac{1}{4}$ गुंज सायीसह किंवा पानांच्या विड्यात सूर्योदयापूर्वी अर्धातास खावे. हृदयबल्य, वीर्य दृढ करणारा, सर्व रोगघ्न. तीनसप्तक सेवनाने अंगांत चांगली रग येते.

शुल्बनागेन्द्र– ताप्यहतताम्र १० ग्रॅम, नागेश्वर १० ग्रॅम, हिंगूळ १० ग्रॅम एकत्रून महाळुंग रसासह घोटून वडी बांधावी. पणती संपुटांत मुद्रून २ किलो गोवरींचा अग्नि द्यावा. याप्रमाणें प्रत्येक वेळी १० ग्रॅम हिंगूळ मिळवीत व महाळुंगरसे घोटीत ३ अग्निपुटे दिल्याने जें भस्म मिळतें ते $\frac{1}{10}$ ते $\frac{1}{4}$ गुंज साय, मध, तुप, दूध, साखर आदिमधून अथवा अनुपान परत्वे दिल्याने नानाप्रकारचे वातविकार, शूळ, आमवातोद्भव हृद्रोग, आमवात, संधिवेदना, वीर्यदोष, स्त्री जननेंद्रियांचे रोग व त्या इंद्रियांची अपूर्ण वाढ, पुरुषांचे जननेंद्रियांची अपूर्ण वाढ व वीर्यविकार आदि अनेक रोग नष्ट होतात.

गोमूत्र भावित प्रवाळभस्म– १ किलो प्रवाळ गोमूत्रासह खलून वडी बांधून गजपुट द्यावें. याप्रमाणें सात अग्नि दिल्यानें भस्म सिद्ध होते. मात्रा १ ते २ गुंजा शक्तीप्रमाणें. मूत्रपिंडाचे सर्व रोग, शोथादि नष्ट होतात. पाण्याबरोबर दिवसांतून ३ वेळ द्यावे. ३ ते ७ सप्तकांत नाहीसा जाते.

शोथहरलोह– लोहभस्म १० ग्रॅम, त्रिकटु ३० ग्रॅम, यवक्षार १० ग्रॅम, शुष्क शिलाजतु १० ग्रॅम एकत्र घोटून ठेवणें. १ ते २ गुंजा अनुपानाने सर्वांगशोथ, पांडु, कावीळ, अग्निमांद्य आदि नष्ट होतात.

कोंवडयाच्या विष्ठेचे भस्म (चरणायुध किट्टभस्म)- कोंबडयांची विष्ठा मडक्यांत बंद करून ती जर १ किलो असेल तर गजपुटाचा अग्नि द्यावा. मात्रा १ गुंज. मूत्रपिंडाचे सर्व रोग, शोथ, नळगुदादि नष्ट होतात. गोमूत्र भावित प्रवाळभस्माप्रमाणें गुणधर्म आहेत.

शीलोदक प्रस्तर योग– सांगोला स्टेशन पासून ८–१० कोसावर शुक्राचार्यांच्या स्नानाच्या परिसरांत शीलोदक आहे. तेथे त्याचे जमिनीवर वाहतां वाहतां घट्ट होऊन दगड बनतात. त्यांच्या झऱ्याचें तोंड बंद होते, तेव्हां लोक ते दगड फोडून तोंड मोकळे करून उदक वाहाते ठेवतात.' हे दगड लिंबू रसासह घोटून ३ भावना द्याव्यात. नंतर तत्समान सिद्धगंधक मिळवून चुन्याच्या निवळीसह १ दिवस घोटून सुकवून बाटलीत भरून ठेवावे. १ ते २ गुंजा क्षय कुष्टादि सर्व रोगावर द्यावे. दिवसांतून २ वेळ.

हे शीलोदकाचे दगड सोलापूर शहराच्या उत्तरेस ओढयाच्याकडेस जमिनींतही सांपडतात.

सिद्धगंधक– गंधक २०० ग्रॅम लोहकढईत प्रथम २० ग्रॅम तूप टाकून मंदाग्नीने गंधक पातळ करावा. आंबट डाळिंबाचा रस $\frac{1}{2}$ लिटर थोडा थोडा टाकीत तो रस त्या गंधकांत जिरवावा. अशाच प्रकारे अर्धा लिटर कागदी लिंबू रसही जिरवावा. नंतर केळकंद किंवा केळीच्या सोपटाचा रसही $\frac{1}{2}$ लिटर जिरवावा; म्हणजे तो गंधक निर्गंध व पांढरा होतो. तो बाटलीत भरून ठेवावा. मात्रा २ ते ६ गुंजा, ताजे तुपासह दिल्यानें क्षय, वांति, अम्लपित्त,

दाह, रक्तदोष, मूळव्याध, अंगखाज, संग्रहणी आदि नष्ट होतात. वेध कार्यात उपयोगी.

तालकद्रुति– हरताळ, गंधक २½–२½ ग्रॅम, नवसागर ५ ग्रॅम व सोरा १ ग्रॅम एकत्र घोटून कोंबडीच्या रित्या अंड्यांत भरून सात मातकापडे द्यावीत. अशी अनेक अंडी भरावीत. नंतर एका टिनचे डब्यांत जवसाचे शुद्ध तेल १ ते १½ लिटर भरून, तारेच्या शिक्यावर ही अशी मातकापडे दिलेली ४–६ अंडी तेलांत बुडतील अशी लोंबत ठेऊन; चिपाडांचा अग्नि त्या डब्याखाली ४–६ घंटे द्यावा. नंतर स्वांगशीत झाल्यावर त्या अंड्यात मिळणारी तालकद्रुति बाटलीत भरून ठेवावी. ही अनेक कार्यांत उपयुक्त आहे. घशांत लावण्यानें घशातील कंठशालूक, घटसर्प आदि नाना विकार नष्ट होतात. पोटांत देण्याची मात्रा १ थेंब दुधात, मधात, तूप साखरेत, मलईसह देणें. व्रण, कोथ ( कुजत जाणारा व्रण ) रक्तदोष, त्वग्विकार आदि अनेक रोगावर उपयोगी.

त्रिभुवन कीर्ति– हिंगुळ किंवा रससिंदूर, वचनाग, टंकण, पिंपळमूळ, कांव १०–१० ग्रॅम, त्रिकटु ३० ग्रॅम एकत्रून निर्गुंडीरस तुळसरस, धोतरापर्णरस, आलेरस, यांच्या ३।३ खलून भावना देऊन कांड्या अगर ½ गुंजेच्या गोळ्या बांधाव्यात, आलेरस, मधात दिल्याने सर्व ज्वर, फ्लू, पडसे, कास, श्वास नष्ट होतात. गोवर, कांजिण्या आदि लौकर बाहेर पडतात. जरूरीप्रमाणें दिवसांतून ३–४ वेळ अनुपानानें द्यावे.

षड्बिंदु तेल किंवा घृत– योगरत्नाकर किंवा रसरत्नाकरातील पाठांत गोरखमुंडी व पानकुटीरस ही दोन द्रव्ये जादा घालून तयार करावे. गुणवृद्धि होते.

यमाश्मभस्म- (अकीकाचे भस्म)- यालाच यमनी पत्थर म्हणतात. हा पाषाण तापवून गुलाब पाण्यांत २१ वेळ विझवावा; मग दुधासह घोटून ३ ते ५ गजपुटे द्यावीत. भस्म, फुलून लाहीवत होते, म्हणून झांकणी जोड वा मडके अवकाश राहील असें मोठे घ्यावे. मात्रा ½ ते १ गुंज. गुणधर्म अभ्रकाप्रमाणें. कारण हें द्रव्य म्हणजे घनीभूत अभ्रकच असावे. दोहोंतील सांपडणारे मूलभूत पदार्थ एकच आहेत.

श्लीपदनाशक गण—गोरखमुंडी, पुनर्नवा, मंजिष्ठा, वावडिंग, रुईमूळसाल, जिवाळीमूळसाल (जलमधुक), उन्हाळी (शटपुंखा) मूळसाल, वर्धारामूळ, सत्पुरुषसाल, कपालीपर्ण व बीज १।१ भाग एकत्र करणें. मात्रा ८ ते १२ गुंजा पाण्याशी ३ वेळ, ३ महिने. श्लीपदनाशक.

विष्णुदंती— उंदरविंवी— विठ्ठलदंडी— विठोबाची गदा किंवा विठोबाचा सोडगा या नांवाचे जेपाळवर्गीय क्षुप. याचा आकार व्यायामाच्या मोगरी, गदेप्रमाणें बुडाकडे मोठा गोल वसून वर पाने येतात. जेथें बारीक असा आकार असतो. तेथें उंची १ ते २ फूट.

कुंडली कंद द्रवसार— कडवंची कंद तुकडे २० ग्रॅम, मृत संजीवनी सुरा २०० मिलीग्रॅम, ८ दिवस भिजत ठेवून नंतर गाळून घेणें. मूत्रल, जलोदरांतील पाणी निघून जाते. ७ दिवस द्यावे. मात्रा ३० ते ६० थेंब + पाणी १ औंस मिळवून देणें.

जलनिर्हरण मिश्रण— जलमारी (कुप्पी), पुनर्नवा, सोरमीठ, नवसागर, शृंगभस्म, निशोत्तर, भुईतवंड किंवा सोनामुखी, खर्वा (बाळ हिरडा) एरंडेल लावून भाजलेला १०–१० ग्रॅम, त्रिपत्री ३० ग्रॅम एकत्र करणें. ४ ते १२ गुंजा दिवसातून ३ वेळ द्यावें. जलोदरांतील पाणी लघवी, घाम, मलावाटे जाते.

आरोग्यवर्धिनी– रसरत्न समुच्चयांतील पाठ.

सारस्वतचूर्ण, सारस्वतारिष्ठ– भैषज्य रत्नावलीतील पाठ पाहावा. महामंजिष्ठादिकाढा–शार्ङगधरसंहिता पाहा.

ब्रह्मसोमा मिश्रण ब्राह्मी, गोरखमुंडी, भृष्ठवेखंड, यशवंती (जास्वंद–जपा) पाने किंवा फुले किंवा साल, सुंठ, वाकेरी, पिंपळी, शंखपुष्पी, खुरासानी ओवा, शेपा, आस्कंध, मंजिष्ठा, सर्पगंधा हीं सर्व १।१ भाग घेणें. ४ ते १२ गुंजा. पाण्याबरोबर. स्मरणशक्तीचा ऱ्हास, उन्माद, अपस्मार, अमानुषोपसर्ग इत्यादि मेंदूचे विकारावर उपयोगी.

लालपुडी– क्षारकपर्दभस्मयोग १० ग्रॅम, अभ्रकभस्म १० ग्रॅम, माक्षिक भस्म १० ग्रॅम, गोदंतीभस्म १० ग्रॅम, कांव २० ग्रॅम, अफू बोडांचा घन १० ग्रॅम एकत्र घोटून ठेवणें. १ ते २ गुंजा चहाबरोबर दिल्याने पंधरा वीस मिनिटात डोके दुखी थांबते. अंगमर्द, पिंडिकोद्वेष्टन, ज्वर, कास, प्रतिश्याय, फ्लूचा ताप आदि अनेक रोग नष्ट होतात.

क्षारकपर्दभस्मयोग– सोरा, नवसागर, तुरटी प्रत्येकी ५० ग्रॅम घेऊन एकत्रून त्यांतच कवडीचे तुकडे अगर भरडचूर्ण ५० ग्रॅम मिळवून झांकणी जोडांत भरावे. ते असे की मिश्रण मावून अवकाश राहील. नंतर ३० गोवऱ्यांचा अग्नि द्यावा. भस्माचा एकच मोठा व वजनानें हलका बत्तासाच मिळतो. तो घोटून ठेवावा. मात्रा १ ते २ गुंजा. शूलघ्न.

व्यंकटेश्वर रस– रससिंदूर १० ग्रॅम, अभ्रकभस्म १० ग्रॅम, यंकीयोग ४० ग्रॅम एकत्रून नारायणीचे रसांत घोटून गुंज प्रमाण गोळ्या बांधाव्यात. दिवसांतून ३ वेळ पाण्याशी १।१ गोळी द्यावी.

रक्तोत्पादक, रक्तवर्धक, पित्तशामक, फाजील उष्णताशामक, अस्थिपोषक, शरीरस्थ अनेक पिण्डाना उत्तेजक आहे.

यंकीयोग गोमूत्रांत तुळस १०० ग्रॅम वाटून एकजीव झाल्यावर त्यांत चापट शिंप (वृत्तजीवा शुक्ति) १० ग्रॅम, चित्राश्म १० ग्रॅम व सोरमीठ २० ग्रॅम मिळवून घोटून चांगले मिसळल्यावर, यंकी १०० ग्रॅम मिळवून घोटून सुकत आल्यावर, पुनः १०० ग्रॅम यंकी मिळवून घोटावे. सुकत आल्यावर तिसऱ्यांदा यंकी १०० ग्रॅम मिळवून घोटून सुकत आले म्हणजे झांकणी जोडांत बंद करून २०-२५ गोवऱ्यांचे अग्निपुट द्यावे भस्म होते.

वरुणादि क्वाथ–वायवर्णासाल, शेवगासाल, ओवा, पुनर्नवा, हळद, दारुहळद, पिंपळाची साल यांचा $\frac{1}{4}$ काढा करून, त्यांत हिराबोळ ४ ते ८ गुंजा घालून १ ते २ औंस एकावेळी याप्रमाणें सकाळ सायंकाळ प्यावयास द्यावा; म्हणजे अर्बुदशोथ, आन्तर-विद्रधि घटसर्पशोथ, जठरांत्रातील मार्गावरोध या विकृति नाहीशा होतात.

मज्जाघृत–बकऱ्याच्या नळ्या व फेरकलीजाचे तुकडे, त्याचेच जठर व आंत्राचे तुकडे बेतानें पाणी घालून शिजवावे. त्यांच्या अंगचे पाणी सुटल्यावर न नळ्या उकडून निघाल्यावर त्या नळ्यामधील मज्जा (मगज) काढून (रिकाम्या नळ्या भस्म करण्यास बाजूस काढून ठेवाव्यात. हेंच अजास्थिभस्म) तो व वरील रस्सा तत्सम तुपांत शिजवून तूप उरल्यावर बरणीत भरून ठेवावे. मात्रा १ ते २ तोळे. पोळी, भाकरी, भातावर घ्यावे किंवा साखरेबरोबर खावे. रक्तवर्धक, राजयक्ष्मा नाशक, बल्य, पांडुयोगघ्न व ल्यूकीमिया– ब्लडकॅन्सर–रक्तार्बुदावर उपयोगी आहे.

बस्ताण्डकल्प– बकऱ्याची वृषणे (कपूरे) आणून त्याना साखर लावून हातानें चोळून निघणारा द्रव डिश (थाळी) मध्यें घेऊन सुकवावा. पांढरी पूड मिळते. मात्रा १ लहान चमचा भरून (८ ते १२ गुंजा) केशर १ ते २ गुंजा मिश्र करून दुधाशी सकाळी व रात्री दिल्यानें वीर्यक्षीणता, वीर्योत्पत्तिमंदता नष्ट होते, आणि अपूर्ण वाढीची वीर्यबीजे पूर्ण वाढीची निर्माण होऊ लागतात व संतती होते. पुरुषांचे व स्त्रियांचे संततीहीनत्व जातें.

तुत्थसव्वीरयोग– मोरचूद ५ ग्रॅम, सव्वीर ५ ग्रॅम एकत्र घोटून कोंबडीच्या रिकाम्या अंड्यांत भरून मातकापड करावे, आणि २०० ग्रॅम वजन धान्य भुश्यामध्यें पुरून तो भुस्सा राकेल ओतून पेटवून द्यावा. स्वांगशीत झाल्यावर जें भस्म मिळतें त्याची मात्रा $\frac{१}{२०}$ गुंज तूप, साखर, मलई, आदिमधून सकाळी एक वेळच द्यावें. फिरंगरोग, तज्जन्य नाना पीडा, हृदयविकार, अर्बुदादि नष्ट होतात. बलाबल पाहून मात्रा $\frac{१}{१०}$ गुंजेपर्यंत देता येते.

नारायणी = नरक्यानारायण – गूथकाडी – घुगाडा – रान-कोथिंबीर–पित्तपापडा इत्यादि नांवानी ओळखतात. साधारणतः कोथिंबिरीप्रमाणें दिसणारे नाजूक सुकुमार वीतभर झुडूप ज्याला थोडा घाणकट वास येतो अशी वनस्पति आहे.

यंकीं–व्यंकटी–रानमिरची नांवाचे वीतभर उंचीचे–जाड, पाने असलेले व प्रत्येक पानांच्या खाकेत जोड शेंगा. आंत काळ्या बारीक बिया असलेलें झुडूप आहे. सर्वांग कडू असते. बारीक पांढरी फुले येतात.

जीवंती–जीवंतीचे वेल जमिनीस चिकटून असतात किंवा एखादे निर्गुंडी, बोर आदि झाडाला वेढून राहिलेले आढळतात.

जीवंतीचा नैसर्गिक वर्ग (नॅचरल ऑर्डर) अर्क-रुचकीचा वर्ग आहे. पाने जाड, सप्पक चवीची, एक ते दीड इंच लांब व पाव ते अर्धा इंच रुंदीची असतात. सारिवा किंवा अनंतमूळा प्रमाणेंच या वेलीला कापूस भरलेली एकाच देंठास दोन दोन शेंगे प्रमाणें ३-४ इंच लांबीची बोंडे येतात. बहुधा शेताचे बांधावर या वेली पसरलेल्या दिसतात. जीवंतीची मोठी जात स्वर्णजीवंती नांवाची जिला मराठीत हरणवेल म्हणतात ती होय. हिला पिवळट रस तिचे देठांतून निघालेला दिसतो म्हणून हिला स्वर्णजीवंती म्हटले आहे. जीवंती ऐवजी ही स्वर्णजीवंती चालते. पण शक्यतो जीवंतीच मिळवून तिचा उपयोग करावा.



## वेबा मिश्रण–

वेड्या बाभळीच्या शेंगांची टरफले, तुळशीची पाने, रान तुळशीची पाने, ज्येष्ठमध, पारिजातकाची साल, सापसण (ईश्वर मूळ), सातवीण साल, रसांजन, भुईउंबर साल, चित्रकमूळाची साल, चिलारीची साल अथवा तिचे मूळावरील साल १।१ भाग एकत्र वस्त्रगाळ बुकणी करणें. मात्रा ४ ते ८ गुंजा पाण्याशी दिवसांतून ३ वेळ. सर्वप्रकारचे मलेरिया सारख्या ज्वरावर उत्तम आहे.

## गंधवरा–

दालचिनी, लवंग, वेलची १।१ भाग एकत्र करणें. मात्रा २ ते ८ गुंजा. दूधसाखर, मध, जेष्ठमध चूर्णासह इत्यादि. गुणधर्म-सुगंधि, दीपनपाचन, कण्ठ्य, वृक्कदोषहर, कास, श्वास, क्षय, पडसे, नाशकवांति, विषूचीनाशक, शूळघ्न, स्वेदवह व मूत्रवह स्त्रोतसावर कार्य करून दोष निर्हरण करणारी, नानाप्रकारचे ज्वरोत्पादी आमविषाना मारक व उरःस्थानाचे शोधन करणारीं आहे. दि. ३ वेळ. प्रयोजक औषधासह द्यावी.

## हिंग्वष्टक चूर्ण–

हिराहिंग १० ग्रॅम, त्रिकटु मिळून ३० ग्रॅम, लवणद्वय २० ग्रॅम, जिरेद्वय २० ग्रॅम, सर्जिका १० ग्रॅम, हळद १० ग्रॅम, ओवा १० ग्रॅम आणि निम्बूकाम्ल १ ग्रॅम एकत्रून चांगले घोटून ठेवणें. मात्रा ४ ते ८ गुंजा. पाणी, ताक, जेवणाचे वेळी प्रथम तूप भातात कालवून याप्रमाणें जरूरी प्रमाणें खावें. गुणधर्म–क्षुधाकर, पोटफुगी, पोटशूळ, गुल्मनाशक इत्यादि.

**ग्रंथाधार –**

अमरकोश
योगरत्नाकर
चरक
सुश्रुत
अष्टांगहृदय
रसरत्नसमुच्चय
रसेंद्रचूडामणी
रसराजलक्ष्मी मुकुंदी टीका
रसरत्नाकर
सॅविल
भैषज्य रत्नावली
चाणक्य–कौटिलीय अर्थशास्त्र
आनंदमाला सटीक हस्तलिखित
योगतरंगिणी–तेलुगु
मात्रापुस्तक हस्तलिखित
वैद्यजीवन–लोलिंबराज
सिद्धभेषज मणिमाला
अनुपान तरंगिणी
पांचभौतिक चिकित्सा





**लोह वैक्रान्त भस्माचे गुणधर्म–**

रसतः तिक्त मधुर, शीतवीर्य, अतिमधुर विपाकी, गुरु, स्निग्ध, कषाय, रूक्ष आहे. रक्तास्थापन आणि रक्तवर्धक जठराचा अभिष्यंद नाशक, वातरक्त, त्वचारोग, फिरंग नाशक बल्य आहे; शिवाय लोह भस्मांतील सर्व गुणधर्म थोड्या फार प्रमाणांत यांत आहेत.

**स्फटिक भस्माचे गुणधर्म–**

रसतः मधुर, समशीतोष्णवीर्य, मधुर विपाकी, पित्त, दाह नाशक, रक्तदोषघ्न, शोषनाशक आहे. रत्न वैक्रान्ताचे भस्माभावी उपयोगी.

ताप्यहत ताम्राचे गुणधर्म नेहमीच्या ताम्र भस्माप्रमाणेंच पण हे भस्म सौम्य आहे.

चित्राश्म–जहरमोहराखताई. या दगडाचें एक दोन दिवस घोटून सूक्ष्म चूर्ण केले म्हणजे तीच पिष्टी होय.

गुणधर्म–विषहर, मेंदू, हृदयाला बलकर, छर्दिहर, अतिसार, दाह, ज्वरनाशक, दीपन, पाचन, अन्नविषहर, बालकाना परम हितकर, शोथघ्न, विषूचीहर, तालुभ्रंशनाशक–मात्रा–१ ते २ गुंजा–पूर्णमात्रा ८ गुंजापर्यंत. अनुपान–दूध, लिंबूरस, पाणी इत्यादि.

# आगामी प्रकाशन

१ रसराजलक्ष्मी सानुवाद

७०० वर्षापूर्वीचा वैद्यक ग्रंथ

( प्राचीन महाराष्ट्री टीकेसह )

२ उपचारसार सटीक अनुवाद

३ वैद्य वैद्येश्वर विठ्ठल पंडितांचे

प्राचीन मराठी भाषेतील

तीन ग्रंथ एकत्र

या ग्रंथाचे प्रकाशनापूर्वी अगाऊ रक्कम भरणारास सवलतीचे दरांत हे एक किंवा सर्व ग्रंथ मिळतील.

पत्रव्यवहाराचा पत्ता:-

आयुर्वेद अनुसंधान केंद्र

१/१४ ई, आनंदधाम मुरारजी पेठ, सोलापूर-४१३ ००२.